
आंदोलन
वर्ष 14 । अंक 04। मूल्य 20/-
शाश्वत विकासासाठी
नोव्हेंबर 2022 । पृष्ठे 36
झाडे नुरली निसर्ग विरला
साज सृष्टीचा गळून पडला
पाऊस सरला मेघहि फिरले
मातीमधले सत्व हरपले
वरुणाचे जलचक्रही रुतले
पृथिवीचे काया मन सुकले
विषवृत्तींच्या विळख्यामागील
सत्य कसे ना कुणा उमगले
नभांगणातिल वसुंधरेला
मनुष्यरुपी ग्रहण लागले
-विजय दिवाण



आंदोलन

**शाश्वत विकासासाठी**

जन आंदोलनांचा राष्ट्रीय समन्वयाचे
मासिक संवाद माध्यम

**शाश्वत विकास न्यासाचा उपक्रम**


वर्ष चौदावे, अंक चौथा

नोव्हेंबर २०२२ ॐ मूल्य रु. २०/-




# दिवाळी विशेषांक २०२२



**कार्यकर्ते/विद्यार्थ्यांना वर्गणीत सवलत मिळू शकेल.**
**खाली दिलेल्या ईमेल किंवा मोबाईलवर सवलतीसाठी संपर्क साधा.**
**आंदोलन शाश्वत विकासासाठीची वर्गणी भरा आता ऑनलाईन!**

**Name of A/c.: Andolan Shashwat Vikasasathi**
**Bank Of India, Naigaum Cross Road Branch, Dadar (East),**
**MUMBAI 400014. Current A/c No.: 003520110001099, IFSC: BKID0000035**

**वर्गणी ऑनलाईन जमा केल्यानंतर खाली दिलेल्या ईमेल किंवा मोबाईलवर मेसेज करून लागलीच कळवा! ईमेल :** andolan.magazine@gmail.com
**मोबाईल : 9869984803/ 9869392013/ 7045003640**

**जन आंदोलनांचा राष्ट्रीय समन्वय - मराठी संवाद माध्यमाचा अंक - वर्ष २६ अंक ११**

**कार्यालय** : आंदोलन शाश्वत विकासासाठी, द्वारा केमिकल मजदूर सभा, २९-३०, पहिला मजला, ए विंग, हाजी हबीब बिल्डिंग, नायगांव क्रॉस रोड, दादर (पूर्व), मुंबई - ४०००१४.

**वार्षिक वर्गणी - व्यक्ती - रु. २५०/- संस्था - रु. ३००/-**
**१२ वर्षांची वर्गणी - व्यक्ती रु. २,५००/- संस्था - रु. ३,०००/-**

• आपण एकाहून अधिक वर्षांसाठी वर्गणी भरू शकता. • चेक/ड्राफ्ट ‘आंदोलन शाश्वत विकासासाठी’ ह्या नावाने काढावा. • वर्गणी शक्यतो चेक/ड्राफ्टनेच पाठवावी • तसे शक्यच नसल्यास मनिऑर्डरने पाठवावी.

• **चेक/ड्राफ्ट/मनीऑर्डर ठाण्याच्या पत्त्यावरच पाठवाव्या.**

संपादकीय

# सरफरोशीकी तमन्ना अब हमारे दिलमें है ....
# देखना है जोर कितना, बाजू – ए – कातिल में है!?

दिवाळीचा जल्लोष आणि त्याबरोबरीनेच घराघरातून उमटलेला वंचितांचा आक्रोश, ही द्वंद्वात्मक परिस्थिती आपणही अनुभवली असणारच! दिव्यांच्या प्रकाशात भोवतालचा अंधार केवळ दिसू नयी तर नष्टही व्हावा, ही आशाही मनभर उमटली असणार. तरीही हे स्वप्न साकार करण्याचा विश्वास यावा म्हणून काही संकल्पही व्यक्त झाला का मनोमन ? भारतभरची आर्थिक, सामजिक आणि राजकीय विडंबना पाहता, सखोल अभ्यासता हीच वेळ आहे, परिवर्तनकारी संकल्प दृढ करण्याची!

पहा, एकेका मंचावर चालली आहे तरी काय ? गुजरातच्या निवडणूक प्रचारात अटीतटीची स्पर्धा आहे, तीही किती खरे-खोटे समोर खोलते आहे. निवडणूक जिंकण्यासाठी आंतरराष्ट्रीय युद्धांइतकीच रणनीती आता पराकोटीला पोहोचलेय. नोटांवर बंदी झाली, जनसामान्यांनी ती भोगली. आता त्यावर गणेश, लक्ष्मीची कलाकारी आणि लाखोंना एकसाथ शासनपदांवर भर्ती देऊन मिटवणार बेरोजगारी; असे खेळ आपण पहातो आहेतच. गुजरातचा विकास आम्हा सामाजिक कार्यकर्त्यांनी व आंदोलनांनी रोखला असे आंदोलनकारींना सर्वसत्ताधीश व सामर्थ्यवान घोषित करण्याचे राजकारणही समजून हसत आहेत. परंतु या विकासाच्या राजकारणाशी जोडलेले मोदानी मॉडेलचे अर्थकारण हे निवडणुकीपुरते मर्यादित नाही. ते कुठे दारु व ड्रग्सच्या अदानींच्याच बंदरावरून होणारा १,७५,००० कोटींच्या नशील्या पदार्थांचा व्यापार तर कुठे धर्म-जातिची नशा आणणारा मतांचा बाजार, या मार्गांनी समाजाला विशेषत: युवापीढीला जळ्यात पकडणार हे निश्चित!

या पार्श्वभूमीवरच तर 'नफरत छोडो! संविधान बचाओ!!' या दोन आव्हानांची व आवाहनांची सामन्वयिक भूमिका तिरंग्याच्या रुपाने हाती घेऊन आम्ही रस्त्यावरच नव्हे तर गावागावात, प्रत्येक जिल्हा पातळीवर, पोहोचणार आहोत. ७५ वर्षे पार पाडलेला देश, अनेक्विध जाति – धर्मांचाच नव्हे तर वेष, भेष, रंग, रुपाची विविधता टिकवत अमृतमहोत्सव साजरा करतो आहे तो स्वातंत्र्याचा! आज तेच हरवले आहे ना ? सत्तारुढ शक्तींना प्रश्न विचारण्यासाठी पट्टा कुठला, हवी आहे ती अभूत हिम्मत! बुलडोझरच कोर्ट असल्यागत गंगा जमुना तहजीबच ध्वस्त होत असताना, त्यामागचे वास्तव सत्य समोर आणण्याची ताकत! सत्तेवर थोडीथोडकी (कुठे २६ तर कुठे ३१ टक्के!) मते मिळवूनही आरुढ होणाऱ्यांच्या हाती आता नवनवी हत्यारे, कायदे व संस्थाही बेकायदेशीरपणे वापरण्याची दादागिरी असताना आपण अहिंसक सत्याग्रही मार्गानेच चालत राहणार, हे दर्शवणाऱ्या यात्राही आता बनल्या आहेत परिवर्तानच्या चिंगाऱ्या!

राहूल गांधी पक्षाच्या गदारोळातून बाहेर पडून संसदबाह्य वाटेने चालताना पहा किती उन्मळून येते आहे अनेकांची उर्जा! तेही जनसंघटनांचा आवाज नव्हे तर देशात समता आणि न्यायाची मेढ रोवण्याचे एकेक आवेदन हाती व कानीही सामावून घेत आहेत, हे कौतुकास्पद! त्यांच्यापुढे येणारे अनेकानेक मुद्दे हे साऱ्या सर्वधर्मसमभावी, संविधानप्रेमी राजकीय पक्ष व नेत्यांचा अजेंडा बनवण्यास उपयुक्त ठरू शकेल, हाच विश्वास घेऊन अनेक जनसंघटनाही सामोऱ्या येऊन समर्थ देताहेत.

मात्र साऱ्या यात्रांच्या पलिकडे बरेच काही उरते आहे, आव्हानात्मक असे वास्तव! संयुक्त किसान मोर्चाच्या आंदोलनाने तीन कायदे थोपवले, मगरूर पंतप्रधानांनाही झुकवले तरी धननिर्भर, परदेशी साहूकार बाजारनिर्भर अशा कंपनीराज्याला हटवणे बाकीच आहे! अवकळी पावसाने बरबाद शेतकऱ्याला भरपाई न देता, पीकविम्याच्या कारस्थानातून ५ वर्षांत त्यातील कंपन्यांना ४५ हजार कोटी रुपयांची कमाई देणारे शासन हेच तर माध्यम आहे, बीभत्स विषमतेचे! लॉकडाऊनच्या दरम्यान व नंतरही आपला लाभांश व संपत्ति वाढवत जगतगुरु बनू पहाणारे मुठ्ठीभर भांडवलशहांचे राजकीय नेतृत्वाशी गठबंधन हेच यांच्या मुळाशी असताना आपणही मूलभूत बदल घडवू शकेल अशी करप्रणाली व त्याहीपुढे जाऊन सरदार पटेलांचे पुतळे उभारून नव्हे तर त्यांची कामगिरी पुढे नेत, कोट्यावधी जनतेचे, सर्व क्षेत्रांतील श्रमिकांचे श्रम, कौशल्य, रोजगारच काय जीवनाचेही शोषण करत बनलेल्या अब्जाधीशांची संस्थानेच खरेतर जप्त होणे गरजेचे आहे! यासाठी घटनेतील मार्गदर्शक तत्वे, ३९व्या अनुच्छेदासकट, ही मूलभूत. बंधनकारक मानूनच पुढे जायला हवे! देशातील

**(पान १९ वर)**

खास वृत्त

# गांधीजींना विसरायचं तर अवश्य विसरा! द्वेषभावनेला मात्र पराभूत करा!!

**राजमोहन गांधी**

*शहीदे आझम भगतसिंग यांच्या जन्मदिनी म्हणजेच २८ सप्टेंबर २०२२ रोजी सायंकाळी दिल्लीतील 'गांधी शांती प्रतिष्ठान'मध्ये विचारांना उजाळा देणाऱ्या विशेष परिसंवादाचं आयोजन करण्यात आलं होतं. या परिसंवादाच्या केंद्रस्थानी होते महात्मा गांधींचे नातू आणि प्रसिद्ध चरित्रकार, पत्रकार राजमोहन गांधी. हा परिसंवाद त्यांच्या कोणत्या पुस्तकावर आधारित नसला तरी एक गोष्ट लक्षात घेणं महत्वाचं आहे ती अशी की नुकत्याच झालेल्या स्वातंत्र्याच्या अमृत महोत्सवाच्या निमित्तानं त्यांचं एक पुस्तक प्रसिद्ध झालं आहे. इंडिया आफ्टर १९४७ : रिफ्लेक्शन्स अँड रिकलेक्शन्स असे त्याचे शीर्षक असून पुस्तकाच्या मुखपृष्ठावर गांधीजींचे चित्र आहे. चर्चिलनं भारताबाबत वर्तवलेल्या विघटनाच्या भाकितानंतरही भारत प्रगती करत आहे तो गांधीजींच्या प्रेमाच्या संदेशामुळेच हेच या चित्रातून सूचित केलेलं आहे. दिल्लीतील जेष्ठ पत्रकार अरुण कुमार त्रिपाठी यांनी तयार केलेला या परिसंवादाचा हा वृत्तांत.*

महात्मा गांधींच्या अंगाखांद्यावर लहानाचे मोठे झालेले राजमोहन गांधी यांना जगभरातला महात्मा गांधींबद्दलचा वाढता आदर आणि भारतातील त्यांच्याबद्दलचा वाढता द्वेष याबद्दल अनेक प्रश्न विचारले असता ते म्हणाले की, जर लोकांना गांधींना नाकारायचे असेल, त्यांचा अपमान करायचा असेल आणि त्यांना विसरायचे असेल तर ते तसे होऊ द्या. गांधीजींना वाचवण्यासाठी तुम्ही लढू नका. जर लढायचेच असेल तर द्वेष नष्ट करण्यासाठी लढा. द्वेष करणाऱ्यांचा द्वेष नको, करायचाच असेल तर द्वेषभावनेचा द्वेष करा. परिस्थिती गंभीर आहे; काही दिवसांनी आपल्यापैकी किती जण तुरुंगात असतील किंवा स्वतंत्र असतील हे मला माहीत नाही. पण हे लक्षात असू द्या की १९४७ मध्ये गांधींजींना याहून अधिक भीषण परिस्थितीचा सामना करावा लागला होता. तेव्हा देश स्वतंत्र झालेला नव्हता आणि फाळणीची तलवार डोक्यावर टांगलेली होती, जातीयवादाचा राक्षस भारताच्या डोक्यावर बसला होता. पण कोणाचाही द्वेष न करण्याच्या, कोणालाही न घाबरण्याच्या तत्त्वाला अनुसरून गांधीजींनी त्यांचा सामना केला. या लढ्यात प्रेम आणि निर्भयता ही त्यांची शस्त्रे होती. आजही जर आपल्याला ही द्वेषाची लढाई जिंकायची असेल अहिंसेच्या शस्त्रांवर विश्वास निर्माण करणं आवश्यक आहे.

त्या परिसंवादात उपस्थित असलेल्या या लेखकाव्यतिरिक्त राहुल देव, चंद्र भूषण, संतोष भारतीय, राजेश जोशी, विनोद अग्निहोत्री, हरिमोहन आणि अपूर्वानंद यांसारखे अनेक पत्रकार, सामाजिक कार्यकर्ते आणि प्राध्यापक राजमोहन गांधींकडून हे जाणून घेण्यास उत्सुक होते की, सद्यस्थितीतील द्वेषाचं वातावरण कसं कमी करता येईल आणि हे उद्दिष्ट साध्य करण्यासाठी महात्मा गांधींचं जीवन आणि विचार कसे उपयुक्त ठरू शकतात. यावर राजमोहन गांधी यांनी एका अमेरिकन लेखकाचा हवाला देऊन असं सांगितलं की, 'विसाव्या शतकातील सर्वश्रेष्ठ अविष्कार हा आईनस्टाईनचा सापेक्षता सिद्धांत आणि अणुबॉम्ब नसून महात्मा गांधींचा सत्याग्रह आहे'.

गांधीजींचा सत्याग्रह म्हणजे काय आणि तो कोण व कसा करू शकतो हा एक गंभीर प्रश्न आहे. देवावर श्रद्धा नसणारा खरा सत्याग्रही असू शकतो का ? कारण गांधीजींनी तर श्रद्धावान असण्याची अट घातली आहे. या संदर्भात विचार करता 'राहुल गांधी सत्याग्रहाचा मार्ग म्हणून पदयात्रा करत आहेत, ती यशस्वी होईल का ?' या राजीव गांधी फाऊंडेशनशी संबंधित असलेले जेष्ठ समाजवादी विजय प्रताप यांच्या या प्रश्नाने सारे वातावरण गंभीर बनले.

या प्रश्नावर प्रथम राजमोहन गांधींनी सत्याग्रही आस्तिक

असू शकतो किंवा नास्तिकही असे म्हणून चर्चा पुढे नेण्याचा प्रयत्न केला परंतु त्यानंतर मात्र त्यांनी याबद्दल काहीही सांगता येणार नाही असे सांगितले. डॉ. राम मनोहर लोहिया यांच्यासारखे गांधींचे अनुयायी देखील उपोषण आणि सत्याग्रह करण्यापासून कचरण्याचे हे एक प्रमुख कारण आहे. गांधींजींनी केलेल्या सत्याग्रहाच्या नियमांचा पुनर्विचार होणे आवश्यक आहे. सध्याच्या युगात सर्व देवी-देवतांची मंदिरे आणि जन्मस्थळांचा बहाणा करून आपले राजकारण करणाऱ्यांची देवावर तितकी श्रद्धा नाही. त्यामुळे गांधीजींनी हिंद स्वराज्यात दिलेल्या सत्याग्रहाचा अर्थ आपण पाहिला पाहिजे. त्यांनी सत्याग्रहाला दया, आत्मशक्ती आणि नंतर सत्याग्रह म्हटले आहे. हे समजावून सांगण्यासाठी त्यांनी तुलसीदासांची ती ओळही वापरली आहे

दया धर्म को मूल है, पाप मूल अभिमान। तुलसी दया न छोड़िए जब तक घट में प्रान।।

दया हे धर्माचे मूळ आहे, पाप हे अभिमानाचे मूळ आहे. जोवर प्राण आहेत तोवर दयाबुद्धी सोडू नका.

सत्य हेच ईश्वर आहे असे जेव्हा गांधीजी म्हणतात तेव्हा सत्याग्रहीसाठी देवावरील श्रद्धेचा अर्थ बदलतो. अर्थात ईश्वर हेच सत्य आहे असे गांधीजी पूर्वी म्हणत असत. सत्य आणि ईश्वर यांच्या अशा अदलाबदलीतून तयार होणारी व्याख्या हेच सांगते की प्रयोगशाळेतील शास्त्रज्ञ सत्याग्रह करू शकतो तसाच नास्तिकही सत्याग्रह करू शकतो. कारण प्रत्येकासाठी स्वत:चे सत्य वेगळे असते.

खरा सत्याग्रह मुस्लीम समाजाकडून केला जात आहे हे प्राध्यापक अपूर्वानंद यांचे विधान सर्वांना नि:शब्द करणारे होते. उमर खालिद आणि शर्जील इमाम सारखे तरुण तुरुंगात खितपत पडलेले आहेत परंतु त्यांच्या हक्कांबद्दल राजकीय पक्षांनी मौन बाळगले आहे. लोकांच्या घरांवर बुलडोझर चालवला जातो आणि पण त्यावर टाळ्या पिटल्या जातात किंवा मौन बाळगले जाते. हे मौन बहुसंख्य समाजाचे आहे. लोकशाही संस्थांनी त्यांच्याकडे पाठ फिरवली आहे. त्यांना कधी न्याय मिळेल हे सांगता येत नाही. या अन्यायकारक परिस्थितीत गांधींजींचे केवळ स्मरण करून फारसे काही होणार नाही. गांधीजी तर आता आता गप्प आहेत, तरीही त्यांना का त्रास दिला जात आहे? त्याच्या हत्येनंतर अंधार अधिक गडद झाला आहे. शांतता लांबत चालली आहे.

त्यांच्या विधानाशी सहमती दर्शवत राजमोहन यांनी विचारलेल्या प्रतिप्रश्नाने चर्चासत्रात अधिकच शांतता निर्माण केली. या चर्चासत्रात मुस्लिम बांधव आहेत का, असा सवाल राजमोहन गांधी यांनी केला होता. कुठल्याच कोपऱ्यातून उत्तर आले नाही. ही गोष्ट जशी राजमोहन यांना पेचात टाकणारी होती तशीच परिस्थिती शेवटच्या काळात गांधींजींच्या प्रार्थना सभांचीही होती. मात्र गांधीजींवर टीका करू नये या मुद्यावर बोलताना गांधी पीस फाऊंडेशनचे अध्यक्ष कुमार प्रशांत म्हणाले की, ''मी कबरीतून उत्तर देईन असे गांधीजी म्हणाले होते; जर त्यांनी बोलायला सुरवात केली तर त्यांना कोण रोखणार?''

राजमोहन गांधी यांनी 'मोहनदास-स्टोरी ऑफ अ मॅन, हिज पीपल अँड एम्पायर' हे सारखे गांधींजींचे प्रसिद्ध चरित्र लिहिले आहे. हे पुस्तक २०१९ मध्ये गांधींजीं च्या १५०व्या जयंतीनिमित्त प्रकाशित झाले होते. त्यांचे 'व्हाय गांधी स्टिल मॅटर्स' हे पुस्तक 'हिंद स्वराज' या विषयावरील पुस्तक २०१७ मध्ये प्रकाशित झाले. त्यांनी 'पटेल अ लाईफ' नावाचे सरदार पटेल यांचे चरित्र लिहिले आहे. या उपखंडातील मुस्लिम विचार समजून घेण्यासाठी त्यांचे 'फंडामेंटल्स ऑफ मुस्लिम माइंड' हे पुस्तक उपयुक्त आहे. त्यांचे 'कॉन्फ्लिक्ट अँड रिकन्सिलिएशन्स' हे पुस्तक फाळणीच्या शोकांतिकेवर आणि उपखंडाच्या भविष्याविषयी निर्माण झालेल्या चिंता आणि अपेक्षांवर लक्ष आधारित आहे. राजमोहन हे गांधीजींचे धाकटे पुत्र देवदास गांधी यांचे पुत्र आहेत. त्यांची आई लक्ष्मी चक्रवर्ती राजगोपालाचारी यांची कन्या होती. देवदास गांधी हे हिंदुस्तान टाइम्सचे संपादक होते. राजमोहन गांधी इंडियन एक्सप्रेसच्या बॉम्बे आवृत्तीचे संपादकही होते. १९८९ ची निवडणूकही त्यांनी अमेठीतून राजीव गांधींविरुद्ध लढवली होती.

एकदा त्यांनी पूर्व दिल्लीतून लोकसभा निवडणूकही लढवली होती. लोकसभा निवडणुकीत ते जिंकू शकले नाहीत पण ते राज्यसभेचे सदस्य होते. त्यांचा एक भाऊ रामचंद्र गांधी, यांना प्रेमाने रामू गांधी असे म्हंटले जायचे. रामू यांची प्रतिमा तत्त्ववेत्ता अशी होती. रामू गांधी आता या जगात नाहीत. राजमोहन यांचे

दुसरे भाऊ गोपाळ कृष्ण गांधी हे पश्चिम बंगालचे राज्यपाल होते. तेही इतर भावांसारखे लेखक आणि विचारवंत आहेत.

'१८६९ मध्ये जन्मलेले गांधीजी जर सत्याग्रहाबद्दल बोलत होते, तर चारशे वर्षांपूर्वी १४६९ मध्ये जन्मलेले नानकही प्रेमाबद्दल बोलत होते' असे सांगून मानवाधिकाराचे खटले लढणाऱ्या एका शीख वकिलाने सत्याग्रहाची पाळंमुळं इतिहासात खोलवर नेऊन ठेवली. म्हणजेच सत्याग्रहाची ही मालिका लांबलचक आहे आणि म्हणूनच इतिहास या चांगल्या गोष्टींची दखल घेत नाही हे महात्मा गांधींचे विधान महत्त्वाचे ठरते. त्यानंतर आपला इतिहास राजे-महाराजांच्या विजय-पराजयाची नोंद घेतो. पण जर सर्व मानवी इतिहास हा हिंसाचार आणि द्वेषाने भरलेला असता तर आतापर्यंत मानवी संस्कृती नष्ट झाली असती. एकही माणूस जिवंत राहिला नसता. त्यामुळे इतिहासात हिंसेच्या घटनांच्या जितक्या नोंदी आहेत त्याहून अधिक अहिंसा आणि प्रेमाची परंपरा आहे.

द्वेष पसरवणाऱ्या ज्या लोकांशी आपण लढत आहोत त्यांच्याबद्दल कठोर भाषा वापरू नये, ही पत्रकार राहुल देव यांची सूचना रास्त होती. त्यांच्याशीही प्रेमाने व नम्रतेने संवाद साधला पाहिजे. यामुळे द्वेष कमी होण्यास मदत होईल. इथे गांधींजींचा आदर्श कामी येऊ शकतो. ते कोणाशीही फारसे कटूपणे वागत नव्हते. अगदी इंग्रजांशीही. यावर कुमार प्रशांत म्हणाले की, गांधी वैयक्तिकरित्या कोणाशी कटूपणे वागले नसले तरी त्यांनी ज्या विचारांना आणि प्रवृत्तींना विरोध केला त्याबद्दल कठोर शब्द बोलताना ते मागेपुढे पाहत नसत. म्हणूनच त्यांनी असे म्हंटले असावे की प्रेषित मुहम्मद यांच्या शिकवणीनुसार ही सभ्यता सैतानी सभ्यता आहे.

आउटलुकचे संपादक हरिमोहन म्हणाले की, द्वेष आहे पण वातावरण वाटते तितके कठीण आणि भीतीदायक नाही. हिंदुत्वावाद्यांनी केलेल्या अपप्रचारामुळे अनेक गांधीविरोधकही गांधींजींकडे आकर्षित झाले आहेत. त्यांनी पुस्तके लिहिली आहेत आणि गांधींजींबद्दल आदर निर्माण केला आहे. त्यात मार्क्सवादीही आहेत तसेच आंबेडकरवादीही आहेत. गांधींजींच्या प्रभावामुळेच आता हिंदुत्ववादी गांधींजीना उघडपणे लक्ष्य करण्याची हिंमत करत नाहीत. ते जे काही करतात ते अप्रत्यक्षपणे किंवा गुप्तपणे करतात.

गांधी स्मृती निधीचे माजी अध्यक्ष आणि ज्येष्ठ गांधीवादी रामचंद्र राही म्हणाले की, अशा चर्चा बंद खोल्यांमधून रस्त्यावर आणि चौकांपर्यंत जायला हव्यात. आम्हाला काही मर्यादा आहेत, म्हणून आम्ही संस्थांच्या चौकटीत राहून वादविवाद करतो परंतु आमच्या खिडक्या आणि दरवाजे मात्र उघडे आहेत.

राजमोहन गांधींनी चर्चासत्राची सुरवातच या गोष्टीनं केली की १९२२ मध्ये जेव्हा गांधींजींना देशद्रोहाच्या आरोपाखाली सहा वर्षांची शिक्षा झाली तेव्हा त्यांनी त्यांचा व्यवसाय विणकर आणि शेतकरी असा लिहिला होता. त्यांनी आयुष्यात अनेक भूमिका केल्या पण पत्रकार म्हणून त्यांची भूमिका महत्वाची होती. अनेक पत्रकार आणि लेखकांना त्यांच्याकडून शिकण्यासारखं खूप काही आहे कारण त्यांच्याकडे आलेल्या पत्रकारांना वृत्तांत कसे लिहायचे हे गांधीजी शिकवत असत. प्रसिद्ध पत्रकार विल्यम शेर यांच्याप्रमाणेच त्यांनीही असं म्हंटलं की गांधीजी एखाद्या सामान्य माणसासारखेच होते. त्यांनी जे काही केलं ते आपल्यापैकी कोणीही करू शकतं. म्हणून आपल्याला आशा आहे की एक दिवस आपल्यापैकी कोणीतरी असं महान कार्य करून दाखवेल. पण विल्यम शेर यांनी हीच गोष्ट थोड्या वेगळ्या पद्धतीने सांगितली. ते म्हणाले की, गांधी, बुद्ध, येशू आणि सुकरात यांच्यासारखे लोक स्वत:ला अतिशय सामान्य लोक समजत. आणि हीच त्यांची खासियत होती. म्हणूनच आपण करत असलेले काम एक सामान्य माणूसही करू शकतो, असे त्यांना वाटायचे. पण ती त्यांची चूक होती. (कारण सामान्य माणूस तसे करू शकत नाही.) राजमोहन गांधींनी अशी ग्वाही दिली की आज द्वेषाचा काळ असला तरी तो फार काळ टिकणार नाही, एक ना एक दिवस प्रेमाचा विजय नक्कीच होईल.

(न्युज क्लिकच्या सौजन्याने)

**अनुवाद: ऋजुता खरे**
kharerujuta@gmail.com

विशेष

# भारत जोडो यात्रा हा निव्वळ नित्याचा राजकीय 'तमाशा' नाही

योगेंद्र यादव

जसे फुटबॉलमध्ये, तसेच राजकारणात चेंडूचा ताबा महत्त्वाचा. इतका की राजस्थानमधील संकटंही भारत जोडो यात्रेची सकारात्मकता कमी करू शकली नाहीत.

भारत जोडो यात्रेमुळे निर्माण झालेला अंतरप्रवाह लोकांच्या लक्षात येण्यासाठी एक छायाचित्र पुरेसे आहे.कोसळणाऱ्या पावसात भिजत राहुल गांधी जनतेला संबोधित आहेत आणि हजारो लोक पावसापासून वाचण्यासाठी प्लॅस्टिकच्या खुर्च्या डोक्यावर घेऊनही त्यांचे भाषण लक्षपूर्वक ऐकत आहेत. ही प्रतिमा या यात्रेचा संदेश एक हजार बातम्यांपेक्षा अधिक प्रभावीपणे स्पष्ट करत आहे. ही यात्रा अजून व्हायरल झाली नसावी, पण हे चित्र मात्र व्हायरल झालंय.

यातून या मोहिमेला मिळालेल्या सार्वजनिक प्रतिसादातील सूक्ष्म बदल दिसतो. भारत जोडो यात्रेची सुरुवात खूपच थंड होती. ७ सप्टेंबर रोजी आम्ही कन्याकुमारी येथून सुरुवात केली तेव्हा आम्हाला (लोकांतली) यात्रेविषयीची अजाणता, निंदा आणि धास्ती जाणवली. मला आठवतंय की ही खरोखरच पदयात्रा आहे का हे तपासण्यासाठी एका ज्येष्ठ पत्रकाराने फोन केला होता. ही यात्रा नेमकी काय आहे हे कोणालाच माहीत नव्हते. 'हे काँग्रेस नेते खरेच चालतील का ? राहुल गांधी अधूनमधून यात्रेत सहभागी होणार आहेत का ? की ते खरंच संपूर्ण मार्ग चालणार आहेत ?', 'काँग्रेसची यात्रा हा जास्तीत जास्त रोड शो आणि वाईटात वाईट एक तमाशा तर बनणार नाही ना ?' यात्रेला निघायच्या आदल्या दिवशी काही जवळच्या कौटुंबिक मित्रांना भेटल्याचे मला आठवते. ते स्पष्टपणे धास्तावलेले होते. ''योगेंद्र जी, तुम्ही तुमची प्रतिष्ठा पणाला लावत आहात. तुम्ही काँग्रेसमध्ये सामील होणार नाही आहात हे आम्हाला माहीत आहे, पण या पक्षाशी संबंध म्हणजे मृत्यूशी संग नाही का ?'' त्यांनी विचारलं.

**'काहीतरी सकारात्मक' : ही एक सुरुवात आहे**

भारत जोडो यात्रेच्या पहिल्या महिन्यात काहीतरी बदल घडला आहे. याला राष्ट्रीय मूडमधील बदल म्हणणे थोडे घाईचे ठरेल. पण या यात्रेने 'काहीतरी सकारात्मक घडवून आणले आहे यात शंका नाही', हे मी वारंवार ऐकले आहे. भारत जोडो यात्रा ही केवळ नित्याचा राजकीय तमाशा का ठरली नाही याची सहा कारणे येथे आहेत.

सर्व प्रथम, ही केवळ प्रतिक्रियात्मक मोहीम नाही तर काहीतरी सकारात्मक आणि सक्रिय आहे. बऱ्याच काळानंतर प्रमुख राष्ट्रीय विरोधी पक्षाने सक्रियपणे प्रत्यक्ष जमिनीवर काहीतरी सुरू केले आहे, अजेंडा ठरवण्याचा प्रयत्न केला आहे, आणि कोणीतरी भारतीय जनता पक्षाला प्रतिक्रियात्मक होण्यास भाग पाडले आहे. यात्रेच्या पहिल्या महिन्यातच, राष्ट्रीय स्वयंसेवक संघाने (आरएसएस) वाकडी वाट करून, मुस्लिम विचारवंतांशी संवाद साधला आणि बेरोजगारी, गरिबी आणि असमानता याविषयी चिंता व्यक्त केली... जे मुद्दे या यात्रेत मांडले जात आहेत आणि हा केवळ योगायोग नाही. जसे फुटबॉलमध्ये, तसे राजकारणात: चेंडूचा ताबा महत्त्वाचा. इतकं की राजस्थानात काँग्रेसची अडचण सुद्धा दोन दिवसांपलीकडे भारत जोडो यात्रेची सकारात्मकता रुळावरून घसरवू किंवा पुसून टाकू शकली नाही.

दुसरे म्हणजे, ही केवळ कोणतीही यात्रा नाही - ती एक पदयात्रा आहे. पायी चालणे ही खोल सांस्कृतिक अनुनाद (resonance) असलेली राजकीय क्रिया आहे. पदयात्रेत दु:खाचा समावेश होतो आणि त्यात त्यांच्या विश्वासाची पुष्टी करण्याचे व्याकरण असते. कावड यात्रा असो, अमरनाथ यात्रा असो, नर्मदा यात्रा असो किंवा भारतात होणाऱ्या शेकडो सामाजिक आणि राजकीय यात्रांपैकी एक यात्रा असो, ती चालणारा आणि बघणारा यांच्यातील दुरावा दूर करते. आभासी प्रेक्षक जणू त्यात स्वत:च सहभागी बनतो. सर्वात महत्त्वाचे म्हणजे, पदयात्रा हा संवादाचा वरवरचा नव्हे तर भूमिगत प्रकार आहे: तो कृतीतून व्यक्त होतो.

तिसरे, हा केवळ आभासी प्रतिकार नाही. यात पाय जमिनीवर असतात, शारीरिक शक्तीचे प्रदर्शन असते. भाजप-आरएसएसची वैधतात्यांच्या सार्वजनिक समर्थनाच्या दाव्यावर अवलंबून असल्याने, प्रतिकाराची कोणतीही कृती म्हणून प्रत्यक्ष जमिनीवर ताकद दाखवणे

आवश्यक आहे. (भाजप-आरएसएसचा) प्रत्येक टीकाकार एकाकी/एकटा आहे असं भासवलं जात असल्याने, एकजुटीच्या अभिव्यक्तीसाठी, प्रदर्शनासाठी गर्दीची आवश्यकता असते. रस्त्यावर हजारो लोक एकत्र येणे हा एक शक्तिशाली प्रतिवाद आहे. जेव्हा संसद नि:शब्द केली जाते, तेव्हा तुम्हाला सडकेवर आवाज उठवावा लागतो.

चौथे, हे केवळ 'जमवलेले' जमाव नाहीत; या यात्रेला जनतेचा उत्स्फूर्त प्रतिसाद लाभला आहे. 'तिकीट' इच्छुकांसह काँग्रेस पक्ष आणि त्यांच्या नेत्यांनी मोठ्या प्रमाणात सहभाग घेतला आहे यात शंका नाही. पण भारत जोडो यात्रेत, तीन राज्यांत फिरताना मी हसतमुख इंद्रधनुष्याच्या सर्व रंगछटा पाहिल्या आहेत. प्रत्येक हसण्यामागील मनाचा उलगडा करणे कठीण जाईल, परंतु मला हे स्पष्ट दिसत आहे की या यात्रेने आशा निर्माण केली आहे. यात्रेशी जोडले जाण्यासाठी किंवा पाठिंबा देण्यासाठी शारीरिकरित्या सामील झालेल्यांच्या पलीकडे, कौतुक आणि समर्थनाचे एक विस्तृत वर्तुळ आहे. त्यामुळे यात्रेला कलंकित करण्याचे भाजपच्या आयटी सेलचे अनेक प्रयत्न फोल ठरले आहेत.

पाचवे, ही यात्रा केवळ धर्मनिरपेक्षतेबद्दल नाही. भारत जोडो यात्रेने आज आवश्यक असलेल्या अनेक प्रकारच्या ऐक्याबद्दलचा संदेश दिला आहे आणि अर्थव्यवस्थेतील सर्वात महत्त्वाच्या मुद्द्यांना अग्रभागी आणण्यात यश मिळविले आहे. राहुल गांधी यांचे दैनंदिन भाषण सामान्यत: जात, भाषा आणि धर्माच्या अनेक विभागांमधील एकतेच्या गरजेविषयी असते. नरेंद्र मोदी सरकारवर त्यांनी केलेली टीका तो मुद्दा पुढे आणते पण ते सरकारच्या मुस्लिमांविरुद्धच्या द्वेषाच्या राजकारणापुरतेच मर्यादित नसते. बेरोजगारी, महागाई, नोटाबंदी, वस्तू आणि सेवा कर (जीएसटी) आणि सामान्य गैरप्रशासनाचे प्रश्न त्यांनी सातत्याने आणि आक्रमकपणे मांडले आहेत. कोणत्याही मुख्य प्रवाहातील राजकीय नेत्याने विशिष्ट मोजक्या भांडवलदारांच्या धार्जिणे धोरणाला (क्रोनी कॅपिटलिझमला) शिंगावर घेण्याच्या वा त्याविरुद्ध दंड थोपटण्याच्या काही मोजक्या प्रयत्नांपैकी हा एक आहे. कुठल्याही सापळ्यात न अडकता ही यात्रा स्वत:चे संदेश निर्माण करत आहे.

आणि शेवटी, केवळ काँग्रेस नाही तर भारत जोडो यात्रेला अनेक लोकचळवळी आणि संघटना, सार्वजनिक बुद्धीजीवी तसेच भूतकाळात काँग्रेससोबत फारसे जोडलेले नव्हते असे काही प्रमुख नागरिक यांचाही पाठिंबा आहे. (लेखक या समन्वयाशी सक्रियपणे जोडले गेले आहेत.) जे लोक सामान्यपणे राजकीय भूमिका घेत नाहीत किंवा काँग्रेस पक्षाला पाठिंबा देण्यासाठी ओळखले जात नाहीत ते यावेळी उघडपणे समोर आले आहेत. याला काँग्रेसशी संलग्नता किंवा त्यांच्या नेतृत्वावरील निष्ठा असे समजू नये. हे 'भारत जोडो' च्या भावनेला पुष्टी देते आणि या यात्रेच्या नैतिक आवेगाची पुष्टी करते.

माझ्या काही कौटुंबिक मित्रांनी पूर्वी मला माझी प्रतिष्ठा धोक्यात आणण्याबद्दल सावध केले होते, चेतावणी दिली होती. पण यावेळी ते निश्चिंत होते. ''कुछ तो हो रहा है'', त्यांच्या बोलण्यापेक्षा त्यांचे हसणे 'मोठ्याने' बोलले. ''होय,'' मी मान्य केले, ''जोपर्यंत आपण अंडरकरंटला लाट समजत नाही, तोपर्यंत. पिक्चर अभी बाकी है.''

(theprint.in वरून साभार)

yyopinion@gmail.com

**अनुवाद: छाया देव**

chhayasharad48@rediffmail.com

भूमिका

# नफरत छोडो – संविधान बचाओ अभियान

- २ ऑक्टोबर ते १० डिसेंबर दरम्यान देशभर पदयात्रांचे आयोजन
- २६ जानेवारीपासून 'हर हाथ संविधान!' मोहीम
- ३० जानेवारीला, गांधीजींच्या हौतात्म्य दिनी, दिल्लीमध्ये लाँग मार्च

'विविधतेत एकता' या आपल्या देशाच्या वैशिष्ट्यपूर्ण, सहिष्णु आणि समृद्ध परंपरेला छेद देत, जाती आणि धर्माच्या नावावर देशात विष पेरले जात आहे. सर्वात खेदजनक आणि चिंताजनक बाब म्हणजे हे काम खुद्द देशात सत्तेवर असलेला पक्षच जाणीवपूर्वक, त्यांचा राजकीय अजेंडा म्हणून करतो आहे. विद्वेषाचे विष पसरवून याआधीही आपल्या देशाची फाळणी झाली... अमानुष हिंसा झाली... समाजमनाच्या चिंधड्या उडाल्या. त्या समेटत, देशाला पुन्हा एकात्म बनवत, ती गंगाजमनी परंपरा अबाधित राखत देश धर्मनिरपेक्षतेच्या मार्गाने पुढे गेला; परंतु आता 'हिंदुराष्ट्रा'चा कैफ निर्माण करत पुन्हा एकदा देशाला दुभंगण्याच्या सीमारेषेवर आणून उभे केले जात आहे. त्यासाठी संविधानाचे, मानव अधिकारांचे, लोकशाही संस्था आणि प्रक्रियांचे सरसहा उल्लंघन चालू आहे. हे देशाच्या अस्तित्वासाठी धोकादायक आहे आणि ते थांबवण्याची गरज आहे. विद्वेषाच्या या वणव्यातून देशाला बाहेर काढणे आणि जाती, धर्म, लिंग निरपेक्ष 'माणूसकी' वाचवणे आवश्यक आहे.

देशभरातील शेकडो संघटना, जनआंदोलने एकत्र येऊन या दिशेने एक पाऊल टाकत आहेत 'नफरत छोडो – संविधान बचाओ' अभियानाचे! देशाच्या, महाराष्ट्राच्या नागरिकांना या अभियानात पूर्ण ताकदीनिशी उतरण्याचे आणि राष्ट्रीय एकात्मतेचा जागर करण्यासाठी पुढे येण्याचे आवाहन आहे.

देशात निर्माण केलेल्या या विद्वेष आणि परस्पर अविश्वासाच्या वातावरणात देशाची आर्थिक दिवाळखोरी; सर्व साधनसंपत्ती आणि सार्वजनिक उद्योगांना मूठभर कार्पोरेट्सच्या ताब्यात देणारे देशविघातक धोरण; त्यातून निर्माण होणारी बेरोजगारी, महागाई आणि लूट; शिक्षण-स्वास्थ्यसेवा-अन्नसुरक्षा या मूलभूत गरजांची हेळसांड; या महत्वाच्या सामाजिक प्रश्नांकडून जनतेचे लक्ष वळवले जात आहे. त्यांकडे जनतेचे लक्ष वेधण्याची, त्याची उत्तरे शोधण्याची आणि आग्रह धरण्याचीही गरज आहे. जल-जंगल-जमीन-खनिजसंपदा यांना कार्पोरेट्सच्या ताब्यात जावू न देता त्यावर समाजाचा अधिकार प्रस्थापित करण्याची आवश्यकता आहे. बदलले किंवा गुंडाळले जाणारे समाजहिताचे कायदे, सत्तेच्या स्वार्थी राजकारणासाठी लोकशाही प्रक्रियांना चूड लावत देशभर प्रत्येक राज्यात माजवलेली अंदाधुंदी, त्यावर आवाज उठवणाऱ्या सामाजिक कार्यकर्त्यांची, पत्रकारांची, विद्यार्थ्यांची केली जाणारी नाकेबंदी या साऱ्याला विरोध करत, ही स्थिती बदलण्याचे आव्हान घेऊन हे अभियान चालणार आहे. त्यामुळेच संविधान आणि लोकशाहीला वाचवणे हे या अभियानाचे उद्दिष्ट आहे. विकेंद्रीकरणावर आधारित लोकशाही निर्माण करणे, रोजगार निर्माण करणारी, जीवनाधार अबाधित राखणारी, जगण्याचा अधिकार प्रस्थापित करणारी आर्थिक रचना करणे, प्रत्येक नागरिकाच्या मूलभूत गरजांची पूर्तता करण्यासाठी सार्वजनिक सेवांचे क्षेत्र भक्कम करणे–अशा सर्व मुद्यांवर या अभियानात जनसंवाद होईल आणि जनतेला सामीलकीचे आवाहनही केले जाईल.

**कार्यक्रम**

- देशातील पुरोगामी, धर्मनिरपेक्ष, लोकशाही आणि संवैधानिक मार्गांवर विश्वास बाळगणाऱ्या शेकडो जनसंघटना-जनआंदोलने एकत्र येऊन 'नफरत छोडो–संविधान बचाओ' अभियानाची सुरवात २ ऑक्टोबरला, म. गांधी जयंतीपासून करत आहेत. हा संदेश घेऊन अभियानाच्या पहिल्या टप्प्यात, २ ऑक्टोबर ते १० डिसेंबरच्या दरम्यान देशभरातील जिल्ह्या-जिल्ह्यांमध्ये प्रत्येकी ७५ किलोमीटर्सच्या पदयात्रा काढल्या जातील. आत्तापर्यंत १२० जनसंघटनांनी २५० पेक्षा अधिक पदयात्रांची निश्चिती केली आहे. या यात्रांमध्ये सर्व जाती-धर्मांचे नागरिक सहभागी होतील. दलित, आदिवासी, महिला, शेतकरी, कष्टकरी आवाज उठवतील. यात्रेत कुठल्याही एका संघटनेचा बॅनर वा झेंडा नसेल तर अभियानाचा बॅनर आणि राष्ट्रध्वज असेल.
- या अभियानाचा दुसरा टप्पा असेल २६ ते ३० जानेवारी दरम्यान 'चलो दिल्ली' हा! देशाच्या प्रत्येक राज्यांराज्यांतून आपापल्या राज्यांतून निघून हजारो लोक दिल्लीच्या दिशेने कूच

(पान ३४ वर)

टिप्पणी

# वजा माणुसकी, वजा न्याय

## मिलिंद चंपानेरकर

उद्या कधीतरी देशातील स्थिती किमान पूर्ववत होईल अशी आशा गृहीत धरली, तर उद्या कधीतरी सांप्रत देश-परिस्थितीचा वस्तुनिष्ठपणे इतिहास लिहिला जाईल अशी अशा बाळगता येईल! तसं झाल्यास, आताच्या काळाची 'वजा माणुसकीचा, वजा न्यायाचा काळ' म्हणून इतिहासात नोंद होईल, याबाबत शंका वाटत नाही. या महिन्यात प्रामुख्याने ज्या चार प्रमुख घटना-घडामोडी घडल्या, त्या उदाहरणादाखल लक्षात घेता असंच म्हणावं लागेल.

त्यांतील **एक म्हणजे**, २००२च्या 'बिल्किस बानोच्या बलात्कार व हिंसाचारा'च्या प्रकरणात दोषी आढळलेल्या ११ आरोपींची सजा कमी करण्यास केंद्र सरकारच्या गृहखात्याने संमती दिलेली होती, आणि त्यांतील प्रत्येकाला किमान सुमारे १,००० दिवस तुरुंगाबाहेर राहण्याची 'मोकळीक' दिली गेलेली होती, असं नुकतंच सर्वोच्च न्यायालयात उघड झालं.

**दुसरी म्हणजे,** दिल्लीतील प्राध्यापक जी.एन. साईबाबा आणि अन्य चार 'यू.ए.पी.ए.'खालील आरोपींना उच्च न्यायालयाने दोषमुक्त ठरवून (डिसचार्ज्ड) त्वरित सुटका करण्याचे आदेश दिल्यावर सरकारने सर्वोच्च न्यायालयात धावपळीने धाव घेऊन तो आदेश 'सस्पेंड' करून घेणं; **तिसरी**, नवरात्रीदरम्यान गुजरातमधील खेडा तालुक्यातील उधेडा इथे गरबा-नृत्याच्या वेळी पोलिसांनी अल्पसंख्य समाजातील ७-८ मुस्लीम तरुणांना भरचौकात खांबाला बांधून काठीने झोडपून काढलं; पोलीस स्वत:च कायदा हातात घेऊन गैर-कायदेशीरपणे असा 'न्याय' करत असताना गावातील बहुसंख्याक समाजातील शेकडो स्त्री-पुरुषांनी जल्लोष करत या 'न्याय पद्धती'बाबत आनद व्यक्त करत राहिले! आणि **चौथी** घटना म्हणजे, 'हिजाब-बंदी' प्रकरणात सर्वोच्च न्यायालयाच्या द्वी-खंडपीठातील दोन न्यायमूर्तींनी परस्पर-भिन्न ('स्प्लिट') असा निकाल दिल्याने, ते प्रकरण 'मोठ्या' खंडपीठासमोर जाणं आणि प्रलंबित ठरणं.

**'बिल्किस प्रकरण': गृहखात्याच्या संमतीने 'दिलासा'**

२००२च्या गोध्रा येथील घटनेनंतर गुजरातच्या कुप्रसिद्ध सांप्रदायिक दंग्यांमध्ये गरोदर असलेल्या बिल्किस बानोवर आणि तिच्या आईवर बलात्कार केले गेले आणि तिच्या तीन महिन्याच्या मुलीसह कुटुंबातील इतरांची हत्या करण्यात आली. हे निर्घृण आणि माणुसकीला काळिमा फासणारं दुष्कृत्य करणाऱ्या ११ आरोपींवर खटला भरला गेला आणि २००८मध्ये त्यांना आजीवन कारवासाची शिक्षा सुनावण्यात आलेली होती. यावर्षी १५ ऑगस्ट रोजी राज्य सरकारने त्यांची शिक्षा कमी करून त्यांना मुक्त केलं आणि त्यामुळे खूप गदारोळ झाला आणि राज्य सरकारचा निर्णय वादग्रस्त ठरला. याबाबतची विस्तृत चर्चा याविषयावरील लेखात ('आंदोलन', सप्टेंबर २०२२) केलीच आहे. तेव्हा राज्य सरकारच्या या निर्णयाला केंद्र सरकारची संमती होती वा नाही हे स्पष्ट केलं जात नव्हतं. त्याचप्रमाणे, तेव्हा या प्रकरणाची चौकशी गुजरातमध्ये योग्यप्रकारे होऊ शकत नसल्याने हा खटला महाराष्ट्रात चालवण्यात आला होता, हे लक्षात घेता त्या न्यायालयाची संमती घेण्यात आली होती वा नाही त्याबाबतही राज्य सरकार स्पष्ट उत्तर देत नव्हतं. त्यामुळे, या सजा कमी करण्याच्या निर्णयाच्या वैधतेबाबत चौकशी व्हावी आणि न्याय मिळावा म्हणून विविध संस्थांनी व व्यक्तींनी यासंदर्भात ४ जनहित याचिका सर्वोच्च न्यायालयात दाखल केल्या होत्या. त्यांची प्राथमिक सुनावणी झाल्यावर सर्वोच्च न्यायालयाने गुजरात सरकारला या प्रकरणासंबंधी सर्व कागदपत्रं आणि शपथपत्र न्यायालयात दाखल करण्यास सांगितलं होतं. त्यानुसार, नुकतंच ते सर्व सर्वोच्च न्यायालयात दाखल करणं राज्य सरकारला भाग झालं. विविध वृत्तपत्रांत त्यासंबंधी जी वृत्तं आली त्यावरून हे स्पष्ट झालं की, राज्य सरकारने केंद्र सरकारकडे आरोपींचे

तुरुंगातील 'सद्वर्तन' लक्षात घेता त्यांची सजा कमी करण्यास संमती मागितली होती आणि केवळ १५ दिवसांत केंद्र सरकारने संमती दिली आणि १५ ऑगस्ट रोजी त्या सर्व आरोपींची मुक्तता करण्यात आली होती (त्याच दिवशी पंतप्रधानांनी लाल किल्ल्यावरून केलेल्या भाषणातून स्त्रीच्या सन्मानाबाबत त्यांच्या खास शैलीत उदात्त विधानं केली होती!) इतकंच नाहीतर एकूण चौदा वर्षांच्या कारावासादरम्यान त्यांतील प्रत्येक आरोपीला प्रत्येकाला सुमारे १,००० दिवस 'पॅरोल' वा 'फरलो'च्या रूपाने तुरुंगाबाहेर राहण्याची 'मोकळीक' दिली गेलेली होती. हे सर्व लक्षात घेता अनेक प्रश्न उपस्थित झाले आहेत–आज देशात हजारो आरोपी तुरुंगात आजन्म कारवासाची शिक्षा भोगत असताना केंद्र सरकारच्या गृह खात्याने नेमक्या याच आरोपींची सजा कमी करण्याचा (आणि तोहेई इतका तडकाफडकी) निर्णय का घ्यावा? कायद्याने बलात्काराच्या आरोपींची सजा कमी न करण्याचं प्रावधान असूनही केंद्र सरकारने अशी संमती का द्यावी? याबाबत महाराष्ट्रातील संबंधित न्यायालयाने आणि चौकशी करणाऱ्या 'सीबीआय'ने याबाबत आक्षेप घेतले असूनही केंद्र सरकारने ते नजरेआड का केले? गुजरातमध्ये लवकरच निवडणुका होणार असल्याच्या पार्श्वभूमीवर आपण बहुसंख्याक समाजातील आरोपींचे ही हितरक्षण करू असा 'संदेश' आपल्या समर्थकांना देण्यासाठी केंद्र सरकारने संमती आणि गुजरात सरकारने याबाबत पुढाकार घेतला का? असे अनेक प्रश्न. प्रत्येक आरोपीला एकूण १४ वर्षांच्या कारावासातील जवळपास १,००० दिवस तुरुंगाबाहेर राहण्याची मुभा दिली गेली – अशी मेहरबानी देशातील अन्य कुणा आरोपीला मिळू शकते का? राजकीय हितासाठी ध्रुवीकरणाला प्राधान्य देणाऱ्या 'भाजप'ने बलात्कारींवर 'कृपादृष्टी' दर्शवणं आणि त्यांच्या समर्थकांनी त्या माणुसकीला काळिमा लावणाऱ्या आरोपींचे हारतुरे घालून स्वागत करणे–हे सर्व मूर्तिमंत 'वजा माणुसकी'चंच लक्षण नाही का? तिथे हरयाणामध्ये बाबा राम रहीम यांना दोन साध्वींवर बलात्कार केल्याच्या आरोपाखाली कारवासाची शिक्षा झाली आहे - पंचायत निवडणुकीच्या पार्श्वभूमीवर, त्यांनाही ४० दिवसांच्या 'पॅरोल'वर सोडून अशीच राजकीय 'कृपादृष्टी' दर्शवण्यात येत नाहीये का? तिथेही बाबा राम रहीम 'पॅरोल'वर बाहेर आल्यावर 'भाजप चे नेते त्यांचा बहुमानकरत असतानाची दृश्य पाहायला मिळाली!

**विकलांग 'जी.एन. साईबाबा प्रकरण' : सुटका अमान्य!**

एकीकडे अशी 'कृपादृष्टी' दर्शवत असताना माओवादी कारवायांशी संबंधित कृती करण्याच्या आरोपाखाली ७ वर्षांपेक्षा अधिक काळ गेली कारावासात असलेल्या, ९०टक्के विकलांग असलेल्या प्राध्यापक जी.एन. साईबाबांबाबत जराही दयाबुद्धी दर्शवण्याची सरकारची तयारी दिसत नसल्याचं नुकतंच दिसून आलं. सर्वोच्च न्यायालयाने याबाबत जी भूमिका घेतली, तिच्या न्याय-अन्याय्यतेबाबत माजी न्यायमूर्ती मदन लोकुर यांनी मुद्देसूद आणि विस्तृत भाष्य ('दि वायर', २० सप्टेंबर, २०२२) केलं आहे.

दिल्ली विद्यापीठातील प्रा. साईबाबा, पत्रकार प्रशांत राही व अन्य चार आरोपींविरोधात २०१४ मध्ये 'यू.ए.पी.ए.'अंतर्गत गडचिरोलीच्या सत्र न्यायालयात खटला दाखल करण्यात आला होता. सत्र न्यायालयाने मार्च २०१७मध्ये त्या प्रकरणात निकाल दिला आणि त्यानुसार सर्व आरोपींना 'यू.ए.पी.ए.'च्या विविध कलमानुसार दोषी ठरवण्यात आलं होतं आणि त्यांना आजन्म कारावासाची सजा ठोठावण्यात आली. त्या आदेशाविरोधात आरोपींतर्फे उच्च न्यायालयात जे अपील करण्यात आलं होतं, त्याची सुनावणी नुकतीच मुंबई उच्च न्यायालयाच्या नागपूर खंडपीठासमोर (न्या. रोहित देव आणि न्या अनिल पानसरे) झाली आणि १४ ऑक्टोबर रोजी न्यायाधीशांनी त्यांची निर्दोष मुक्तता केली. त्यांना या आरोपातून 'डिसचार्ज' करण्यामागचं महत्त्वाचं कारण हे होतं की, 'यू.ए.पी.ए.'अंतर्गत खटला दाखल करण्यासाठी सरकारच्या सक्षम 'ऑथॉरिटी'ची संमती मिळवणं अत्त्यावश्यक असतं; परंतु, सरकारी पक्षाने ती वेळीच मिळवलेली नव्हती. पहिल्या ५ आरोपींविरुद्ध कारवाई केल्यावर ९ मे, २०१४ रोजी साईबाबा यांना अटक करण्यात आली होती. त्यानंतर १५ फेब्रुवारी २०१५ रोजी पहिल्या ५ आरोपीं-विरूद्धच संमती मिळवलेली होती, साईबाबा यांच्यासाठी नाही. तरीदेखील १६ फेब्रुवारी, २०१५ रोजी साईबाबांसह सहाही आरोपींविरूद्ध पोलिसांनी अंतिम अहवाल दिला आणि सत्र न्यायालयाने त्यांच्या विरोधातील 'यू.ए.पी.ए.'अंतर्गत गुन्ह्यांचा 'कॉग्निझन्स' (दखल) घेऊन कारवाई पुढे सुरू केली आणि

२१ फेब्रुवारी, २०१५ रोजी आरोपनिश्चिती (फ्रेमिंग ऑफ चार्जेस) केली. २ ऑक्टोबर, २०१५ रोजी पुरवणी दोषारोप-पत्र दाखल करण्यात आलं. माजी न्या. मदन लोकूर यांनी याच 'क्रोनोलोजी'कडे लक्ष वेधून उच्च न्यायालयाच्या खंडपीठाने याची गंभीर नोंद घेऊन सत्र न्यायालयाचा खटला पूर्णत: रद्दबात्तल ('नल अँड व्हॉइड') का ठरवला त्याची विस्तृत कारणमीमांसा केली आहे. उच्च न्यायालयाने साईबाबा यांच्यासह सर्व आरोपींना निर्दोष ठरवलं आणि 'डिस्चार्ज' केल्याचा निकाल दिला आणि सर्व आरोपींना तात्काळ तुरुंगातून मुक्त करण्याचे आदेश दिले ( ६ आरोपींपैकी पांडू नरोटे या तरुण आरोपीचा यावर्षी ऑगस्ट महिन्यातच मृत्यू झाला – त्याच्या आजाराकडे दुर्लक्ष केल्याने त्याचा मृत्यू ओढवल्याचे आरोप आहेत). 'यू.ए.पी.ए.' कायद्याची कलमं अत्यंत कडक असल्याने त्याचा गैरवापर होऊ नये या दृष्टीनेच या कायद्याच्या कलम ४५ अन्वये 'कॉम्पिटन्ट ऑथोरिटी'ची संमती मिळवणं अत्यावश्यक ठरवलं गेलं आहे. परंतु, सरकार व पोलिसांनी त्याचं पालन केल नाही आणि त्यामुळे त्यानी केलेल्या अवैध कारवाईमुळे आरोपींना ७ वर्ष तुरुंगात खितपत पडावं लागलं आणि दहशतवादी ठरवण्यात आलं. हे सर्व लक्षात घेता आणि आरोपींच्या नागरी स्वातंत्र्याचा विचार करता, सरकारच्या चुकीचा फायदा सरकारला मिळू नये, हा बचाव पक्षाच्या ॲडव्होकेट बसंत आणि प्रदीप मान्ध्यन यांचा युक्तिवाद उच्च न्यायालयाने योग्य मानला. आणि आरोपीला कायद्याने दिलेल्या 'सेफगार्डस'चं संरक्षण होणं महत्त्वाचं आहे असा निर्वाळा दिला आणि त्यासंदर्भात सर्वोच्च न्यायालयाच्या 'टाडा' संबंधित निकालांचा हवाला दिला.

उच्च न्यायालयाने वरील आदेश शुक्रवार, दिनांक १४ ऑक्टोबर, २०२२ रोजी सकाळीच केल्यावर त्याच दिवशी सरकारी पक्षाने सर्वोच्च न्यायालयाकडे धाव घेतली आणि या 'डिस्चार्ज'च्या आदेशावर स्थगिती देण्याची तोंडी विनंती केली. न्या. चंद्रचूड यांनी ती मानली नाही तरी पुढील दिवशी (१५ ऑक्टोबर) शनिवारी, सुट्टीचा दिवशी त्याबाबत अर्ज करण्याची आणि गाऱ्हाणे सांगण्याची सरकारला मुभा देण्यात आली. ही सुनावणी सर्वोच्च न्यायालयाचे दोन न्यायमूर्ती, न्या. एम.आर. शहा आणि न्या. बेला त्रिवेदी यांच्या खंडपीठासमोर झाली. हे प्रकरण गंभीर असल्याने उच्च न्यायालयाने केसच्या मेरीटचाही विचार करायला हवा होता, आणि केवळ तांत्रिक मुद्द्यावरून 'शॉर्टकट' स्वीकारून नाही (वास्तविक हा तांत्रिक मुद्धा नव्हता हे वर आलंच आहे) अशी भूमिका या खंडपीठाने घेतली आणि आपले उच्चाधिकार वापरून (जे अत्यंत अपवादात्मक बाबतीत वापरले जातात) उच्च न्यायालयाचा निकाल 'सस्पेंड' केला आणि या प्रकरणातील प्रमुख तीन मुद्द्यांवर दोन्ही पक्षांचे म्हणणे ऐकून घेण्यासाठी पुढील सुनावणी ८ डिसेंबर रोजी मुक्रर केली.

या प्रसंगी बचाव पक्षाच्या वकिलांनी, साईबाबा यांची विकलांग स्थिती आणि अनेक आजार लक्षात घेता सुनावणी होईपर्यंत त्यांना 'हाउस अरेस्ट' मध्ये ठेवावे अशी विनंती केली असता खंडपीठाने 'दहशतवाद्या'चा मेंदू सर्वात 'डेंजरस' असतो, असे विधान करून हे आपण 'जनरल स्टेटमेंट' करत असल्याचं नमूद केलं! (वास्तविक, सत्र न्यायालयाचा निकाल रद्दबात्तल ठरल्याने आरोपी तुर्तास तरी दहशतवादी ठरत नाही, हा मुद्दा कायदेतज्ज्ञांनी उपस्थित केला आहे) वास्तविक, प्रा. साईबाबा यांची स्थिती इतकी बिकट आहे की, अनेक सामाजिक संघटनांनी त्याबाबत २१ जून २०२२ रोजी संयुक्त विधान प्रसृत करून लक्ष वेधलं आहे. ते पोलिओच्या आजारामुळे ग्रस्त असून 'व्हील चेअर'वरच असतात; हृदयासंबंधी समस्या, मेंदूत 'सिस्ट' (गुठळी), हायपर टेन्शन, डाव्या हाताला पक्षाघात (२०१८ पासून). दोन्ही हात आपले कार्य सामान्यपणे करू शकत नसल्याने तुरुंगातही त्यांना प्रात:विधीसह अनेक गोष्टींसाठी सहायकाची गरज पडते. हे सर्व लक्षात घेता अशा व्यक्तीला त्यांच्या वकिलानी केलेल्या विनंतीनुसार सर्वोच्च न्यायालयाची सुनावणी पूर्ण होईस्तोवर 'नजरकैदे'त ठेवलं असत, तर कोणता मोठा धोका राष्ट्राला निर्माण झाला असता ? समजा त्यांचा मेंदू विघातक वाटत असला, तर सर्व मोबाईल, लॅपटॉप आदी उपकरणाच्या वापरावर बंधन घालता आली असती. दुसरं म्हणजे, त्यांच्या अशा सर्व गोष्टी जप्त झाल्या असून सर्व पुरावे न्यायालयाच्या ताब्यात आहेत, हे लक्षात घेता ते कोणतेही पुरावे 'टॅम्पर' करण्याचीही शक्यता नाही. असं सर्व असताना त्यांना 'नजरकैदे'त राहू देण्याचीही मुभा देऊ नये, याला काय म्हणावं ? साईबाबांसारख्या विकलांग व्यक्तीला तुरुंगातून बाहेर येण्याचे संधीच मिळू नये यासाठी

सरकारने इतकी धावपळ, धडपड करण्याचं कारण काय होतं? केवळ ते त्यांच्यापेक्षा वेगळा विचार करतात म्हणून?

हे सर्व पाहता या देशात मानवतेचे वेगवेगळे निकष एकाच वेळी लागू आहेत का, असा प्रश्न पडतो. आणि 'सरकार-समर्थक गुन्हेगारां'साठी वेगळे आणि सरकार-विरोधी तत्त्वांसाठी वेगळे, असं काही आहे का असाही प्रश्न पडतो. जर मुस्लिमांचा द्वेष करणाऱ्या बलात्कारी गुन्हेगारांना हजार दिवस मुक्त सोडलं जातं, तर या देशातील मानवाधिकारासाठी संघर्ष करणाऱ्या सुशिक्षितांना जामीन का नाकारला जावा–'जेएनयू'चा स्कॉलर विद्यार्थी उमर खालिद ते भीमा कोरेगाव प्रकरणातील सर्व आरोपी यांची जामिनावर सुटका व्हावी, त्यांच्या विरोधातील पुरावे खोटे ('प्लँटेड') असल्याने त्यांची सुटका व्हावी, म्हणून देशभरातील आणि विदेशातीलही अनेक बुद्धिवादी मागणी करत आहेत. पण, सरकार त्याची जराही दखल घेत नाही आणि न्यायालयेही ठाम भूमिका घेत असल्याचं दिसत नाही. राजकीय दृष्टिकोन महत्त्वाचे की मानवी न्याय महत्त्वाचा? की वजा माणूसकीच राजकारणासाठी महत्त्वाची!

**गरबा-नृत्याचा आनंद आणि विकृतानंद!**

नवरात्र सुरू होण्याअगोदरच मुस्लीम युवकांनी गरबा नृत्यात सहभागी होऊ नये, अशा गर्जना (धमकीवजा) गुजरातमधील काही नेते करत होते. परस्परांच्या सणांच्या आनंद सोहळ्यात सहभागी होणं ही गोष्ट गेली कित्येक वर्ष अत्यंत सामान्य मानली जात होती आणि त्यातून या लोकशाहीतील सामान्य नागरिकांच्या निकोप दृष्टिकोनाचं आणि जीवनशैलीचं दर्शन घडवणारी होती आणि आहे. परंतु, ज्यांना धृवीकरणाचं आणि त्यावर आधारित असं राजकारण करण्यात रस आहे, खुमखुमी आहे आणि त्यातून राजकीय फायदाही मिळवायचा आहे, ते मात्र गेल्या काही वर्षात अत्यंत सक्रिय झाल्याचं दिसून येत आहे. एरवी दोन गटांत काही क्षुल्लक भांडण झालं, तर त्यातून सामान्यत: मोठी समस्या उदभवायची नाही. परंतु, आता मात्र त्याचा राईचा पर्वत करून आपण एका समाजाचे हितरक्षण करणारे आहोत असा अभिनिवेश करून आत्यंतिक तिरस्कार व्यक्त करणाऱ्यांची संख्या वाढलेली दिसून येते. इतकंच नाही तर अशा गोष्टीत पोलीस यंत्रणा आणि विकृत आनंद घेणाऱ्या 'प्रेक्षकांची'ही संख्या वाढलेली दिसून येते. गुजरातमधील उधेडा गावात हेच दिसून आलं. ८ ऑक्टोबर रोजी बहुसंख्याक आणि अल्पसंख्याक तरुणांमध्ये गरबा नृत्यादरम्यान काही वाद झाला, बाचाबाची झाली. काही स्थानिक नेते तिथे पोहोचलेच होते. त्यानंतर पोलिसांनी काही अल्पसंख्याक तरुणांवर दगडफेक केल्याचा आरोप करून एका पाठोपाठ त्यांतील प्रत्येकाला भरचौकात खांबाला बांधून सर्वांसमक्ष दंडुक्याने फटके दिले आणि नंतर पोलीस स्टेशनमध्ये नेऊन त्यांच्यावर गुन्हे दाखल केले. पोलीस त्यांना मारत असताना तिथे जमलेले बहुसंख्याक टाळ्या वाजवून पोलिसांचा 'उत्साह' द्विगुणीत करत असल्याचं दृश्य दिसून येत होतं. वास्तविक, त्या तरुणांनी काही गुन्हा केला असल्यास त्याबाबत न्यायनिवडा करण्याचा आणि शिक्षा देण्याचा हक्क केवळ न्यायालयाला आहे, पोलीसांना नाही. या संदर्भात गुजरात उच्च न्यायालयात दाखल केल्या गेलेल्या याचिकेत स्थानिक गुन्हा शाखेचे पोलीस, पोलीस अधिकारी आणि इतर ज्या पोलिसकर्मींनी हे कृत्य केलं त्यांची नावं दिली आहेत. त्याचप्रमाणे, त्यात असाही दावा केला गेला आहे की, पोलिसांनी स्वत:च या घटनेचं व्हिडियो चित्रण करून ते समाज-माध्यमांवर प्रसारित केलं. यामागे उद्देश काय असावा? यातून आपल्संख्याक समाजाला काय 'संदेश' द्यायचा होता? कायदा धाब्यावर बसवून केलेल्या या कृत्याचा जमलेल्या लोकांनी आनद लुटावा, याचा अर्थ काय समजावा–धृवीकरणाचं राजकारण करणाऱ्या राजकारण्यांनी सांप्रदायिक विष किती खोलवर रुजवलं, तेच दिसून येत नाही का? एरवी सामान्य जीवनात सदैव माणुसकीचं दर्शन घडवत असलेल्या लोकांना अशा गोष्टीत विकृत आनंद लाभत असेल, तर आपण अराजकाच्या दिशेनेच जात नाही आहोत का? वजा माणुसकी ही एक आवडण्याची गोष्ट ठरू शकते?

**हिजाब, हिजाब... इतकी मोठी समस्या?**

यापूर्वी ('आंदोलन', मार्च २०२२) 'हिजाब'बाबत जे राजकारण कर्नाटकमध्ये सुरू आहे त्याबाबत सविस्तर चर्चा केलीच आहे, त्यामुळे त्याबाबत पुनरोक्ती टाळून त्याबाबत सर्वोच्च न्यायालयात काय झालं ते पाहू. याबद्दल दोन्ही पक्षाचं म्हणणं ऐकल्यावर खंडपीठातील दोन न्यायाधीशांपैकी न्या. धुमल यांनी एखादी विद्यार्थिनी केवळ हिजाबचा वापर करते, म्हणून तिला शिक्षण घेण्यास बंदी करणं इष्ट नसल्याचा स्पष्ट निर्वाळा दिला.

मुस्लीम स्त्रिया शिक्षणात मागे असताना त्यांना शिक्षणासाठी उत्तेजन देणं अधिक महत्त्वाचं आहे, आणि हिजाब वापरायचा वा नाही, हा त्यांच्या निवडीचा प्रश्न आहे आणि त्यांना ते निवडीच स्वातंत्र्य असायलाच हवं अशी भूमिका न्या धूमल यांनी घेतली. कुणाही बुद्धीप्रमाणवादी आणि उदारमतवादी माणसाला पटेल असा आणि संविधानाला संमत असा दृष्टिकोन त्यांनी स्वीकारला. तर दुसरे न्यायमूर्ती न्या. गुप्ता यांनी मात्र त्या विरोधात भूमिका घेतली आणि कर्नाटक उच्च न्यायालयाच्या भूमिकेच समर्थन केलं; एखाद्या विद्यार्थिनीने हिजाब घातल्यास ती त्यायोगे इतरांपेक्षा वेगळी ओळख असल्याचं दर्शवते, त्यामुळे शिक्षण संस्थेच्या व शासकीय शाळेत हिजाब न वापरण्याचा नियम असल्यास तो तिला कायद्याच्या दृष्टीने बंधनकारक राहील अशा आशयाची भूमिका त्यांनी घेतली. दोन न्यायमूर्तींचे एकमत न झाल्याने आता हे प्रकरण दोनपेक्षा जास्त न्यायमूर्ती असलेल्या खंडपीठासमोर जाईल आणि तिथे त्याचे सुनावणी होईल. याबाबत सूज्ञास अधिक काही सांगणे न लागे. परंतु, एक साधासा प्रश्न–या 'हिजाब'मुळे कुणाला काही इजा होत होती का ? अडथळा होत होता का ? ज्या गोष्टीची समस्याच नव्हती तिला इतकी मोठी समस्या बनवून ती न्यायालयापर्यंत का नेण्यात आली ? दोन न्यायाधीशांनी त्याची सखोल चर्चा करावी अशी खरोखरच ती गंभीर समस्या होती/आहे का ? पुरुषप्रधान संस्कृतीत रूढ झालेली ही प्रथा आहे आणि जसजसा मुस्लीम समजसमूहात शिक्षण वाढेल, इतर समजसमूहात ते मिसळतील आणि त्यातील प्रगतीशील घटक अधिक सक्रिय होतील, तसतशी ती प्रथा गळून पडेल, याबाबत आपण नि:शंक असायला हवं. समज सुधारणेची प्रक्रिया हळुवार असते, त्यात सक्ती झाली तर त्याचे प्रतिकूल परिणामच संभवतात. इराणमध्ये स्त्रियांनी आता सक्ती विरोधात जी आक्रमक भूमिका घेतली, त्यातून तेच दिसून आलं. सक्ती ना हिजाब वापरण्याबाबत असावी, ना हिजाब न वापरण्याबाबत असावी. हा ज्याच्या त्याच्या वैयक्तिक निवडीचा प्रश्न असावा–कारण त्यातून नुकसान कुणाचंच काही संभवत नाही. इतर समाजातही अशा अनेक रूढी आहेत–त्यामागचे विचार काही थोर, पुरोगामी आहेत अशातील गोष्ट नाही-मग ती पगडी असो वा, घुंगट असो व कुंकू व मंगळसूत्र–परंतु, त्यामुळे कुणाला अपाय नाही म्हणून त्या रूढी जाव्या याची कोणतीही घाई करण्यात हशील नसते. परंतु, ते न समजता आपल्या बहुसंख्यांक राजकारणाची पोळी शेकून घेण्यासाठी कुणी जर भररस्त्यात आणि कोर्टातही तरुणीची विटंबना करता असेल, तर ती वजा माणुसकीच ठरते ! आणि मग अशा तरुण-तरुणी व्यापक समाजात मिसळण्याच्या प्रक्रियेत असताना त्यांच्यावर जुलूम जबरदस्ती केली तर ते अतिरेकी प्रवृत्तींकडे खेचले जाण्याची शक्यता असतेच ना ?

**विसकटणारी घडी सावरायलाच हवी**

संविधानाची अधिक तोडमोड न होऊ देता, नफरतीच्या, द्वेषाच्या राजकारणाचा, वजा माणुसकीचा, अन्यायाचा पूर्णत: विरोध करून जागृती करण्याच्या हालचाली सुरू झाल्या आहेत. 'भारत जोडो' यात्रा, 'नफरत छोडो, संविधान बचाओ' यासारख्या चळवळी त्या दृष्टीने खूप महत्त्वाच्या ठरतात. ध्रुवीकरणाच्या राजकारणापायी समाजाची घडी विसकटत आहे, ती सावरणं, नव्याने बसवणं अशा चळवळींच्या माध्यमातूनच शक्य आहे.

champanerkar.milind@gmail.com

टिप्पणी

# अंधेरी पोटनिवडणूक: अशी ही बनवाबनवी

**राज असरोंडकर**

जेव्हा ऋतुजा लटकेंना कोणत्याही परिस्थितीत धनुष्यबाण मिळू नये, म्हणून खटाटोप सुरू होता, जेव्हा ऋतुजा लटकेंचा राजीनामा मंजूर होत नव्हता, जेव्हा दबावासाठी त्यांच्याविरोधात भ्रष्टाचाराची तक्रार करण्यात आली होती...तेव्हा रमेश लटके चांगला कार्यकर्ता नव्हता का ? ऋतुजा लटके विधवा नव्हत्या का ? तेव्हा महाराष्ट्राची अमुकतमुक राजकीय परंपरा नव्हती काय ? उगीच आपलं काहीतरी तडजोडीच्या सोयिस्कर भूमिका घ्यायच्या आणि चमचेगिरी हेच ज्यांचं राजकारण असतं अशा कार्यकर्त्यांकडून उदात्तीकरण करून घ्यायचं, हे आता सगळ्याच राजकीय नेत्यांचं धोरण झालेलं आहे. राज ठाकरे त्याला अपवाद नाहीत !

शिवसेना खासदार अरविंद सावंत यांनी योग्य प्रतिक्रिया दिलीय. ते म्हणालेत : राज ठाकरेंनी उशीर केलाय ! तरीही आभार ! शरद पवारांनी फक्त 'उद्या भाजपाने माघार घेतलीच तर राज ठाकरेंकडे बळेचि एकतर्फी श्रेय जाऊ नये' यासाठी प्रतिक्रिया दिलीय. उद्धव ठाकरेंनी फक्त पवारांचे आभार मानून मनसेला व राज ठाकरेंना आपण किंमत देत नसल्याचं दाखवून दिलंय. पाठीत वार करणाऱ्यांच्या सोबत राहून जखमेवर मलम लावू पाहणाऱ्यांचे आभार का मानावेत, हा प्रश्न कदाचित उद्धव ठाकरेंना पडला असावा.शिवाय, निवडणूक झालीच तरी भाजपाला उघड पाठींबा जाहिर करण्यात राज ठाकरेंची कोंडी होणारेय, हे उद्धव ठाकरे व शरद पवार जाणून आहेत. पत्रामुळे राज ठाकरे भाजपाच्याच नव्हें तर स्वत:च्याच सापळ्यात सापडलेत.

२०१४ च्या विधानसभा निवडणुकीवेळी देशभर मोदी लाट होती. त्यावेळीही रमेश लटके शिवसेनेच्या तिकिटावर भाजपाशी युती नसतानाही ५२ हजार ८१७ मतं घेऊन निवडून आले होते. भाजपाच्या सुनील लल्लनप्रसाद यादव यांना ४७ हजार ३३८ मतं पडली होती. विशेष म्हणजे त्यावेळी मनसेसुद्धा मैदानात होती. मनसेचे उमेदवार संदीप सिताराम दळवी यांना ९४२० मतं पडली होती. मराठी मतांमध्ये फाटाफूट होऊनही त्या मतदारसंघात शिवसेनेचा विजय झाला होता.

आता रमेश लटकेंच्या निधनानंतरची सहानुभूती ऋतुजा लटकेंसोबत आहे. उमेदवारीपूर्वी शिंदे-फडणवीस-भाजपाने केलेल्या छळाविरोधातला मतदारांचा असंतोष त्यांच्यासोबत आहे. उद्धव ठाकरेंच्या शिवसेनेचं पाठबळ आहेच आहे. काँग्रेस -राष्ट्रवादीची तीस ते पस्तीस हजार मतदारांची बेगमी सोबत आहे. यापूर्वी महाविकास आघाडीसोबत नसलेले मतदार वळण्याचीही शक्यता आहे.

प्रताप सरनाईकांच्या पत्राच्या माध्यमातून शिंदे गटसुद्धा भाजपाविरोधातील मराठी असंतोषापासून स्वत:ची कातडी वाचवण्याची केविलवाणी धडपड करू लागलाय, यावरून अंधेरी पूर्व विधानसभा मतदारसंघातलं एकंदरीत राजकीय चित्र स्पष्ट व्हावं.

raj.asrondkar@gmail.com

टिप्पणी

# भारताच्या मानवी विकास निर्देशांकाची प्रगती नव्हे अधोगती!

**प्रसन्ना मोहान्ती**

संयुक्त राष्ट्रातर्फे प्रसिद्ध करण्यात आलेल्या मानवी विकास निर्देशांक २०२२ (Human Development Index - HDI) मध्ये भारताचा क्रमांक संपूर्ण जगात खालच्या स्तरावर गेला आहे, जागतिक सरासरीच्या खूपच मागे, अगदी बांगला देशाच्याही खाली! कोणत्याही देशाच्या आर्थिक वाढीसाठी आणि सर्वांगिण विकासासाठी मानवी विकास निर्देशांक अतिशय महत्वाचा असतो; पण स्वातंत्र्याच्या 'अमृत काळात' प्रवेश करत असताना आणि जगातील पाचवी मोठी अर्थव्यवस्था म्हणवून घेत असताना,तसेच कोविडचा सर्वच देशांवर सारखाच वाईट परिणाम झालेला असतानाआपल्या देशाने या सप्टेंबर २०२२ मध्ये प्रसिद्ध करण्यात आलेल्या या महत्वाच्या निर्देशांकातइतर देशांच्या तुलनेत सपशेल मार खाल्ला आहे.

आपल्या देशाची सर्वात जमेची बाजू म्हणजे आपली सर्व जगात जास्त असणारी तरुणांची संख्या! १५ते २९ या वयोगटातील तरुणांची संख्या आपल्या देशाच्या लोकसंख्येच्या २७.२ टक्के आहे. आज इतरत्र वयस्कर होत चाललेल्या देशांच्या तुलनेत हे आपलं मोठं सामर्थ्य आहे; पण या महत्वाच्या मानवी संसाधनाचा दर्जा जर आपण राखू शकलो नाही तर आपल्या अर्थव्यवस्थेच्या विकासाला हे मोठं आव्हान आहे आणि २०२२ च्या मानवी विकास निर्देशकातून हेच व्यक्त होत आहे. मानवी विकास निर्देशांकात आरोग्य (आयुर्मान), शिक्षण (शाळेतील शिक्षणाची वर्षे) आणि दरडोई उत्पन्न या गोष्टींचे मोजमाप ग्राह्य धरण्यात येते, म्हणजे फक्त सकल राष्ट्रीय उत्पादनाचा (Gross Domestic Product - GDP) विचार न करता देशाच्या नागरिकांचा एकूण विकास विचारात घेतला जातो. संयुक्त राष्ट्राचा अहवाल सांगतो की भारताचा मानवी विकास निर्देशांक १९१ देशांमध्ये १३२ इतका खाली गेला आहे. २०२० मध्ये तो १८९ देशांमध्ये १३१ इतका होता. या निर्देशांकात समाविष्ट असलेला भारताचा संयुक्त स्कोअर ० ते १ या श्रेणी मध्ये ०.६३३ इतका आहे जो ०.७३२ या जागतिक सरासरी स्कोअरच्याही खूप मागे आहे. या श्रेणीतील पहिल्या २८ देशांचा स्कोअर ०.९ च्या वर आहे. बांगला देशचा स्कोअर सुद्धा ०.६६१ म्हणजे आपल्या वरच्या स्थानी आहे. मानवी विकास निर्देशांकात असलेल्या सर्व पैलूंचे वेगळे स्कोअर बघितले तर चित्र अजूनच निराशाजनक आहे. आरोग्याच्या विषयात भारताचा नंबर आहे १३५ आणि सरासरी आयुर्मान ६७.२ वर्षे, जेव्हा जगाचे आयुर्मान आहे ७१.४ वर्षे. बांगला देशाचे आयुर्मान आहे ७२.४ वर्षे, आपल्यापेक्षा जास्त. शिक्षणामध्ये म्हणजे लोकं कमीत कमी किती वर्षे शाळेत जातात या आधारावर ठरवलेल्या श्रेणीमध्ये भारताचे स्थान १३९ असून शाळेची सरासरी वर्षे ६.७ आहेत. या श्रेणीत जगाची सरासरी ८.६ वर्षे आहे, तर बांगला देशाची ७.४ वर्षे आहे, म्हणजे इथेही बांगला देश आपल्या वर आहे. दर डोई उत्पन्नात भारत थोड्या चांगल्या म्हणजे १२६ स्थानावर आहे. भारताचे सरासरी दर डोई उत्पन्न $६,५९० असून जागतिक सरासरी आहे, $१६,५७२! भारताच्या २.५ पटीने जास्त! बांगला देश इथे मात्र आपल्या खाली आहे, त्याचे दर डोई उत्पन्न आहे, $५,४७२.

**मानवी विकास निर्देशांक आपल्या देशाची काळी बाजू अधोरेखित करतो, ती म्हणजे वाढती विषमता!**

जेव्हा विषमता वाढते तेव्हा देशाची आर्थिक, सामाजिक वाढ धोक्यात येते. मानवी विकास निर्देशांकात अजून एक निर्देशांक समाविष्ट आहे, विषमता समयोजित मानवी विकास निर्देशांक (Inequality adjusted Human Development Index (IHDI)! या निर्देशांकात भारताचा ० ते १ या श्रेणीमध्ये स्कोअर आहे ०.४७५, मानवी विकास निर्देशांकापेक्षा २५ टक्केने कमी. या निर्देशांकाची जागतिक सरासरी आहे ०.५९ म्हणजे मानवी विकास निर्देशांकाहून १९.४ टक्केने कमी. भारतापेक्षा बरीच कमी. इथेही बांगलादेश आपल्यावर मात करतो. बांगलादेशाचा स्कोअर आहे ०.५०३, मानवी विकास निर्देशांकाहून २३.९टक्केने कमी.

मानवी विकास निर्देशांक लैंगिक विषमतेचे सुद्धा मोजमाप

करतो. लैंगिक विषमता ही देशाच्या एकंदर शाश्वत वाढीवर गंभीर परिणाम करणारी गोष्ट आहे. या निर्देशांकातही भारताचे स्थान १३२ आणि आणि स्कोअर आहे ०.४९. हा स्कोअर सुद्धा बांगला देशाच्या ०.५३ स्कोअरपेक्षा कमी आहे पण जागतिक सरासरी ०.४७ पेक्षा थोडा जास्त आहे. आणखी एक तितकीच गंभीर गोष्ट मानवी विकास निर्देशकात मोजली जाते, ती म्हणजे बहुआयामी गरिबी निर्देशांक (Multi-dimensional Poverty Index). यामध्ये सुद्धा आरोग्य, शिक्षण आणि राहणीमान बघितलं जातं आणि एकंदरीत नागरिकांमध्ये असलेल्या वंचिततेचा आढावा घेतला जातो. या निर्देशांकात अर्थातच ३६.९६ करोड गरीब असलेल्या भारताचा क्रमांक सर्वात वरती लागतो. (२०१५–१६ या वर्षी झालेल्या शेवटच्या सर्वेक्षणानुसार). याच सर्वेक्षणानुसार भारतात २२.५ टक्के नागरिक अत्यंत गरिबीत म्हणजे प्रतिदिन फक्त $१.९ खर्च करण्याची क्षमता असण्याच्या परिस्थितीत रहातात. ही संख्या नोटाबंदी आणि जीएसटीच्या चुकीच्या धोरणांपूर्वीची आहे: यानंतर आणि कोरोना महासाथीनंतर यात नक्कीच बरीच वाढ झाली असेल.

यासर्व गोष्टी हेच दर्शवतात की भाताची मानवी विकासाची प्रगती न होता अधोगती होते आहे आणि तातडीचे उपाय केले नाहीत तर परिस्थिती आटोक्याबाहेर जाईल.

(सेंटर फॉर फायनानशियल अकाउंटॅबिलीटीच्या सौजन्याने)

prasanna.mohanty7@gmail.com

**अनुवादः मीनल उत्तुरकर**

meenal16@gmail.com

**(संपादकीयः पान ४ वरून)**

सर्वोच्च १ टक्का धनाढ्यांच्या संपत्तीवर २ टक्के संपत्तिकर व वारसाईच्या संपत्तीवर ५०टक्के कर लावला तर १६ लाख कोटी रूपये शासकीय तिजोरीत येऊन पडतील व सर्व जनतेस मोफत शिक्षण व आरोग्य सेवेचा लाभ मिळेल व शेतकऱ्यांना योग्य हमीभाव!

निसर्गनिर्भर समुदायांचे लढेही चालूच राहणार! मोदी सरकार भूमीच नव्हे तर त्यापाठोपाठ आता जंगलही उद्योगपतींना देणार, त्यासाठी ''ग्रामसभा''चा निर्णायाचा अधिकार काढून घेणारे, नवे नियम येत्या हिवाळी संसदसत्रात आणणारा, तर जंगलच काय, जीवनही संपवणार! आजीविकेचा हा लाखोंचा स्त्रोत तर प्राणवायुचा करोडोंचा स्त्रोत! वनसुरक्षा कयदा – १९८० चे हे सुधारित नियम, २००६चा वनाधिकार कायदा व पेसा कायदा यावर तर आघात करणारच परंतु जंगलनाशातून नदी, भूजल, उपजाऊ जमिनी, जैवविविधता, जडीबूटी, वन्यजीवही संपवणार! हे आदिवासी व सर्व समाज जाणून घेईल का ? पर्यावरणाच्या चर्चा व घोषणा फक्त ग्लसगो, पॅरिसमध्ये, जलवायु परिवर्तनाच्या मुद्यावर होणे निकामी ठरते आहे!! धरातलावर, खरे निसर्ग व जीवन वाचवणारे परिवर्तन आणण्यासाठी आवश्यक अशा जल, जंगल, जमीनच काय, साऱ्या अर्थव्यवस्थेच्या 'समता, सादगी, स्वावलंबन' याच मूल्यांवर आधारित नवनिर्माणाची कास धरण्यासाठी चर्चा– विचाराबरोबरच कार्यबद्ध होऊयात!

याचसाठी आवाहन आहे आपणा सर्वांना! देशभरात, आपापल्या जिल्ह्यात ७५ किलोमिटरच्या पदयात्रा आयोजित करा व विष फैलावणाऱ्यांच्या विभाजनवादी प्रचाराला बळी न पडण्याचे आवाहन जनजनांपर्यंत पोहोचवा! माणुसकीची साद देत, १० डिसेंबरच्या मानव अधिकारदिनी मानवधर्मी होऊन सारे मानवअधिकार वाचवण्याचा मार्ग प्रज्वलित करा, भारतातील नागरिकांना प्रबोधित करा! त्याही आधी १५ नोव्हेंबरला आठवा बिरसा मुंडाचा प्रकृति–धर्म! जंगल भांडवलशहांना पस्त व ध्वस्त करण्याची सूट देणाऱ्या नव्या नियमांची प्रत जाळून या वनविनाशी कार्याला नाकारा! गावसभांतून प्रस्ताव पारित करा! आपापल्या लोकप्रतिनिधींनाही जागरूक करा! 'वन है तो जीवन है', हे सांगून, पटवून!

२६ नोव्हेंबरला संविधान दिवस! यादिवशी शेतकरी आंदोलनाच्या स्मृतीस उजाळाच पण सर्वोच्च न्यायलयात, 'धर्मनिरपेक्षता' व 'समाजवाद' हे संविधानाच्या प्रस्तावनेतून हटवण्यासाठी टाकलेली याचिका प्रलंबित असताना व कोट्यावधींचे संविधनिक अधिकार, 'आजादी'चे अमृतच हिरावून विषारी, हत्यारी हल्ले होऊन धोक्यात आणणाऱ्यांना आव्हान देण्याचा संकल्प घ्याच!

... आणि ३० जानेवारीला सकळी तर पोहोचायचे आहे, २६जानेवारीच्या प्रजासत्तक दिनापासून चालत, दिल्लीमध्ये, जंतरमंतरवर...तिथून दुपारनंतर राजघाटावर! या शहीद दिवशीच मनोमन शपथ घेवुयात –

सरफरोशीकी तमन्ना अब हमारे दिलमें है .... देखना है जोर कितना, बाजू – ए – कातिल में है!?

टिप्पणी

# २२ प्रतिज्ञा विवाद आणि भाजप परिवाराची धार्मिक दडपशाही

उत्तम जोगदंड

५ ऑक्टोबर २०२२ रोजी दिल्ली येथे बौद्ध धम्माची दीक्षा घेताना लोकांनी २२ प्रतिज्ञा घेतल्या. या कार्यक्रमात आम आदमी पार्टी (आप) चे नेते आणि मंत्री राजेंद्र पाल गौतम उपस्थित होते. यावर भाजपने धार्मिक भावना दुखावल्या म्हणून आक्षेप घेणे, कायदेशीर कारवाईची मागणी करणे आणि त्यामुळे गौतम यांना राजीनामा द्यावा लागणे हा प्रकार अत्यंत गंभीर आणि चीड आणणारा आहे. गंभीर यासाठी की या प्रकरणामुळे भाजप परिवाराचा धार्मिक दहशतवादाचा, दडपशाहीचा चेहरा उघडा पडला आहे. एवढेच नव्हे तर या बाबतीत गौतम यांच्याच 'आप'ने आणि अन्य सेक्युलर (म्हणवणाऱ्या) पक्षांनी पाळलेले सोयिस्कर मौन ही बाब सुद्धा हेच दर्शवते की भाजप/संघ परिवाराच्या धर्मद्वेषी अजेंड्यामागे हे सारे पक्ष अक्षरशः फरफटत जात आहेत, प्रसंगी संवैधानिक मूल्यांना पायदळी तुडवत आहेत.

२२ प्रतिज्ञा या 'आप'चे नेते गौतम यांनी तयार केलेल्या नसून डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांनी १४ ऑक्टोबर १९५६ रोजी लाखो बांधवांसह धर्मांतर करतांना सर्वांना विचारपूर्वक दिलेल्या आहेत. हिंदू धर्माने लादलेल्या वर्ण-जाती-आधारित भेदभाव, अन्याय, पाशवी अत्याचार, गुलामगिरी झेलणाऱ्या समाजाला मुक्ति देण्यासाठी त्यांनी समता, स्वातंत्र्य, बंधुत्व आणि मानवतेचा मार्ग बौद्ध धम्माच्या रूपाने दाखवला. या नवीन मार्गावर चालण्यासाठी जुना बुरसटलेला मार्ग सोडणे हे तार्किक दृष्ट्या ओघाने येतेच. तो सोडण्याचे शब्द-स्वरूप म्हणजे या २२ प्रतिज्ञा. या प्रतिज्ञा म्हणजे धर्माधारीत गुलामगिरिच्या जोखडातून शूद्र-अतिशूद्र यांच्या मुक्तीचा जाहीरनामाच आहे. १९५६ सालानंतर, जे शूद्र-अतिशूद्र बांधव या जोखडातून मुक्त होऊन बौद्ध धम्माचा मार्ग स्वीकारू इच्छितात ते या २२ प्रतिज्ञा स्वेच्छेने घेतात. यातील काही प्रतिज्ञा पुढील प्रमाणे आहेत: १) मी ब्रह्मा, विष्णू, महेश यांना देव मानणार नाही किंवा त्यांची उपासना करणार नाही. २) मी राम व कृष्ण यांना देव मानणार नाही किंवा त्यांची उपासना करणार नाही. ३) मी गौरी-गणपती इत्यादी हिंदू धर्मातील कोणत्याही देव-देवतेस मानणार नाही किंवा त्यांची उपासना करणार नाही. ४) देवाने अवतार घेतले, यावर माझा विश्वास नाही. ५) गौतम बुद्ध हा विष्णूचा अवतार होय, हा खोटा आणि खोडसळ प्रचार होय असे मी मानतो.

हिंदू धर्मात असतानाचे आपले जे देव होते ते हिंदू धर्म सोडल्यावर न मानण्याची, त्यांची उपासना न करण्याची प्रतिज्ञा घेणे यात हिंदू धर्मीय देव-देवतांचा अवमान कसा होतो ? यात कुठेही हिंदू धर्मियांना तुम्ही हे देव मानू नका असे आवाहन केलेले नाही. त्यांच्याविषयी कसलीही आक्षेपार्ह भाषा देखील वापरलेली नाही.

त्यांचा एक आक्षेप असाही असू शकतो की या प्रतिज्ञा 'सार्वजनिक' कार्यक्रमात घेतल्याने भावना दुखावल्या. ज्या वेळेस मोठ्या प्रमाणात धर्मांतरे होतात त्या वेळेस असे सार्वजनिक कार्यक्रम होतात. बौद्ध धम्माच्या (किंवा अन्य धर्माच्या) कार्यक्रमात हिंदू धर्मीय देव-देवतांचे स्तवन केले जावे असा यांचा आग्रह आहे काय ? यांचे स्वतःचे सार्वजनिक धार्मिक कार्यक्रम असतात तेव्हा परधर्मियांविरुद्ध, आपल्याच धर्मातील शूद्र-अतिशूद्र जातींविरुद्ध जे द्वेषाचे, तिरस्काराचे गरळ ओकले जाते ते यांना कसे चालते ? बौद्ध लोकांच्या कार्यक्रमावर मात्र यांचा काही कारण नसताना आक्षेप ! असे असताना, त्यावर आक्षेप घेऊन कारवाईची मागणी करणे ही निव्वळ दडपशाही आणि धार्मिक आतंकवाद आहे, असहिष्णुता आहे.

या सगळ्यातून भाजप-संघ परिवाराचा असली चेहरा समोर येतो. हे धर्मांतर करणारे आणि २२ प्रतिज्ञा ग्रहण करणारे लोक कोण आहेत ? तर ते सर्वच (काही अपवाद वगळता) अतिशूद्र (पूर्वास्पृश्य) किंवा शूद्र आहेत. त्यांचे हिंदू धर्मातील स्थान काय ? हिंदू धर्मातील या जवळपास ८०-८५ टक्के लोकसंख्या असलेल्या शूद्र-अतिशूद्रांचे स्थान (आजही) किती 'खालचे' आहे हे सर्वज्ञात आहेच. (या शूद्र-अतिशूद्रांवर वर्ण-वर्चस्ववाद्यांनी केलेल्या अत्याचाराच्या पापाची कबूली खुद्द सरसंघचालक मोहन भागवत यांनीच अलिकडे दिलेली आहे आणि याचे पापक्षालन केलेच पाहिजे अशी सूचना देखील केली आहे हे लक्षात घ्यायला हवे.) सरसंघचालक काहीही म्हणोत, हे वर्ण-वर्चस्ववादी

लोक आपले वर्चस्व सोडायला आजही तयार नाहीत. दवे नावाच्या ब्राह्मण संघटनेच्या एका प्रवक्त्याने सरसंघचालकांच्या वक्तव्यास विरोध केलेला आहे. (याला काही सन्माननीय अपवाद असू शकतात. परंतु अपवाद म्हणजे नियम नव्हे.) गेल्या सात-आठ वर्षांतील या वर्गावरील अत्याचारांच्या बातम्या हेच सिद्ध करतात. आता हा वर्ग मोठ्या संख्येने या दलदलीतून बाहेर पडतो आहे. त्याला गुलामीचे, 'खालचे' जगणे असह्य झाले आहे.आणि हेच संघ परिवाराचे मोठे दुखणे आहे. जर सरसकट सर्व शूद्र-अतिशूद्र समाज या कर्दमातून बाहेर पडला तर..... ? या प्रश्नाने त्यांची झोप उडाली आहे. हा वर्ग आणि त्यांची स्थिति हे वर्णवर्चस्व अबाधित ठेवण्याचे साधन आहे. संवैधानिक आणि तार्किक मार्गांनी हे रोखणे त्यांना शक्य नाही. सरसंघचालकांचा पापक्षालनाचा मार्ग त्यांना मान्य असणे शक्यच नाही. म्हणून, धार्मिक भावना दुखावल्याचे हत्यार त्यांनी उपसले आहे. असे करून ते शूद्र-अतिशूद्र यांच्या मुक्तीचा मार्ग दडपशाहीने, दंडेलीने बंद करू इच्छित आहेत. आता त्यांचीच सत्ता असल्याने तसे करणे त्यांना सोपेही झाले आहे. त्यालाही शूद्र-अतिशूद्र बधले नाहीत तर यापुढील त्यांचा मार्ग हिंसक असणार आहे. अर्बन नक्षलसारखी नवीन संकल्पना या लोकांवर थोपून, सत्तेचा बडगा उगारून ते आपले उद्दिष्ट साध्य करतील.

आणि भावनेचाच प्रश्न असेल तर या शूद्र-अतिशूद्र लोकांना हजारो वर्षे अस्पृश्यतेची, भेदभावपूर्ण, अन्याय्य, पशुतुल्य वागणूक देतांना (आणि आजही बऱ्याच प्रमाणात हे चालत असताना) या लोकांना देखील भावना आहेत असे कधी यांच्या मनात का आले नाही ? आज ते सन्मानाचे जीवन जगण्याचा मार्ग शोधत असताना त्यामुळे आपल्या भावना दुखावल्याचा बिनबुडाचा दावा करून अडथळे निर्माण करणे हेच या बहुजनांचा अपमान करणारे, भावना दुखवणारे आहे.

या प्रकरणात 'आप'चे मौन हे धक्कादायक असले तरी त्यात आश्चर्य वाटण्यासारखे काहीही नाही. डॉ. बाबासाहेबांचे आणि संविधानाचे नाव बसता उठता घेणारे अरविंद केजरीवाल यांनी भाजपवाल्यांना ठामपणे हे दाखवून द्यायला हवे होते की हे बौद्ध लोक अन्य धर्मियांचा अवमान न करता शांतपणे आपल्या मार्गाने संवैधानिक अधिकार वापरत आहेत. तसेच 'आप'च्या मंत्र्याने बौद्ध धम्माचे पालन करणे हा देखील त्याचा संवैधानिक अधिकार आहे. गौतम यांचा मंत्रीपदाचा राजीनामा केजरीवाल यांनी नामंजूर करायला हवा होता. 

९९२०१२८६२८

टिप्पणी

# राज्याबाहेर शिकणाऱ्या मागासवर्गीय विद्यार्थ्यांची शिष्यवृत्ती बंद!

**प्रतिनिधी**

परराज्यात घेणाऱ्या शिक्षण विद्यार्थ्यांना तत्कालीन महाराष्ट्रातील शिष्यवृत्ती देण्याचा महाविकास आघाडी सरकारचा निर्णय शिंदे - फडणवीस सरकारने रद्द केला आहे. यासंदर्भात महाराष्ट्र शासनाच्याकक्षाधिकारी संगीता शेळके यांनी पत्र निर्गमित केले आहे. त्यामुळे आता परराज्यात व्यावसायिक शिक्षण घेऊ इच्छिणाऱ्या व्हीजे, एनटी, एसबीसी व ओबीसी विद्यार्थ्यांची मोठी अडचण होणार आहे.

महाराष्ट्रातील रहिवासी असलेल्याव परराज्यात शिक्षणाकरिता गेलेल्या व्हीजे, एनटी, एसबीसी व ओबीसी संवर्गातील विद्यार्थ्यांना शिष्यवृत्ती देण्याचा निर्णय महाविकास आघाडी सरकारने २५ मार्च २०२२ रोजी घेतलाहोता; परंतु सत्तेवर आलेल्या शिंदे फडणवीस सरकारने हा निर्णय २ ऑगस्ट २०२२ च्या पत्रकाने रद्द केला आहे. शिकणाऱ्या परराज्यात महाराष्ट्रातील २०१७-१८ या वर्षापासून भारत सरकारकडून मॅट्रिकोत्तर शिष्यवृत्ती परीक्षा शुल्क शिक्षण शुल्क प्रतिकृती निर्वाह भत्ता दिला जाणार होता.

इतर मागास बहुजनकल्याण विभाग ९ मार्च २०१७ रोज सामाजिक न्याय व विशेष साहाय्य विभागाकडून वेगळा झाला. सामाजिक न्याय विभाग अश प्रकारची शिष्यवृत्ती अनुसूचित जाती प्रवर्गातील विद्यार्थ्यांना देतात; परंतु इतर मागास बहुजन खाते परराज्यात उच्च शिक्षण घेणाऱ्यांना शिष्यवृत्ती देत नाही. यात समानता यावी म्हणून महाविकास आघाडी यासंदर्भात निर्णय घेतला होता. आत तो निर्णय रद्द केल्याने परराज्यात शिकणाऱ्या विद्यार्थ्यांमध्ये गोंधळ निर्माण झालेला आहे.

इतर राज्यात उच्च शिक्षण घेण्यासाठी अनुसूचित जातीसोबतच इतर मागास प्रवर्गातील विद्यार्थ्यांना महाराष्ट्र शासनाकडून शिष्यवृत्ती प्रदान केली जाते. त्यामुळे आपल्या राज्यातील विद्यार्थी इतर राज्यात उच्चशिक्षण घेतात. कोरोना व इतर अडचणीमुळे मागील काही वर्षापासून शिष्यवृत्ती दिली नव्हती. राज्यातील नव्या सरकारने मार्च २०२२ या निर्णय रद्द केला. पुढील निर्णय होईपर्यंत शिष्यवृत्ती मिळणार नाही. यामुळे विद्यार्थी अडचणीत सापडला आहे.



आदरांजली

# पर्यावरणाच्या रक्षणाप्रति बांधील सुजितभाऊंना मनस्वी श्रद्धांजली!

## मेधा पाटकर

सुजित पटवर्धन गेल्याची बातमी हृदयद्रावकच! पर्यावरणावर प्रेम करणाऱ्या, ते वाचवण्यासाठी सतत धपडणाऱ्या या वरिष्ठ, कटिबद्ध, अभ्यासू आणि आंदोलक साथीचा सर्वदूर वर काम करणाऱ्या सर्वच जन आंदोलनकारी कार्यकर्त्यांना आधार होता. पर्यावरणवाद्यांचा हा आधारस्तंभ कोसळणे हा देशातील पर्यावरणविरोधी वास्तवावर फार मोठा आघातच आहे.

सुजितभाऊ हे सखोल अभ्यासातून जलनियोजन ते वाहतूक धोरणापर्यंत अनेकानेक क्षेत्रातील नियोजनावर प्रश्न उठवून अत्यंत ठोस पर्याय सुचविणारे होते. त्यांचा शब्दाशब्दातला उद्वेग हा त्यांच्यातील अखंड उर्जा आणि बांधिलकीचाच परिणाम होता. पुण्यातील वृक्षतोड असो वा नर्मदा खोऱ्यातील जल, जंगल, जमिनीचा विनाश ...त्यांना ते सारे असह्य होत असे व ते पोहोचत असत अरुंधती रॉयसह, Rally for the Valley द्वारा नर्मदा खोऱ्यातील निमगव्हाण, डोमखेडीतही! पुण्यातील प्रत्येक मुद्दा धरेवर उभे ठाकून आणि आंतरराष्ट्रीय घडामोडींवरचे भाष्य ते अखेरपर्यंत विज्ञान व भावनांच्या समन्वयातून रेखाटत सर्वदूर पोहोचवत राहिले. आज देशाला याचीच तर गरज आहे. सुजितभाऊंच्या जाण्यामुळे ही प्रेरणाच आता जपवी लागणार, हे विदारक सत्य आहे!

नर्मदेच्या खोऱ्यातून मी लिहिलेले पहिले वहिले लेख, चिकटिने व सादगीने चालवलेल्यासुजितभाऊ आणि वसंत पळशिकरांसारख्यांच्या 'परिसर' या पर्यावरणाविषयी सजग मासिकातच छापले गेले होते. त्या समूहासारख्या सहयोगीनींच जन आंदोलनंचा राष्ट्रीय समन्वयाशी संलग्न संघर्ष आणि निर्माण कार्याला सातत्याने बळ दिले. त्यांच्या या कामात कन्या लारा, अमृता, जावई जो अथियाली व सुजितभाऊंच्या सुविद्य जीवनसाथी शिक्षणतज्ञ विद्याताई ते आत्याबाई, आनंद पटवर्धन ... साऱ्यांचाच सहभाग होता! यात सुजितभाऊंचा चेहरा त्यांच्या निधनाची खबर आल्यापासून डोळ्यासमोर तरळत होता!

नर्मदा आंदोलनाविषयीची सुजितभाऊंची सखोल समज, त्या आंदोलनाच्या 'लोगो'मध्ये, प्रत्येक घोषणा व गीत, प्रार्थना याने नटलेल्या पोस्टर्समध्ये ते हक्काने घडवत गेले! आजपर्यंत चितारली जात आहेत वर्षावर्षाची कॅलेंडर्स, तिही सुजितभाऊंच्या जावई जोभाई कडूनच! जीवनशाळेतील त्यांच्यासह त्यांच्या सर्व कुटुंबियांचे सहकार्य म्हणजेही सुजितभाऊंच्या वटवृक्षाची सावली! जीवंशाळेसाठी आदिवासी पावरी भाषेतील ''अक्षरान ओळखाण'' व ''आमराण काण्या'' या दोन्ही पुस्तकांचे प्रकाशन त्यांच्याच मुद्रा प्रकाशनाने केले व एक अनोखे साहित्य दर्शन, ''आंदोलन'' मासिकापर्यंत देतच राहिले. नर्मदा आणि एनएपीएमच्या पुणे समर्थक समुहातही ते विद्याताईंसह सक्रीय राहिले.

आज पर्यावरण केवळ जलवायुवरील चर्चेत, आंतरराष्ट्रीय मंचांवरच अडकले असताना, सुजितभाऊंसारख्या local to Global साऱ्या पर्यावरणीय ध्वस्ततेची जाणीव, समस्यांकरील संशोधन, लेखन, प्रकाशन व प्रबोधन करणाऱ्या सहयोगाला आम्ही मुकलो आहोत.

सुजितभाऊंची प्रेरणा, अच्युतभाई पटवर्धनांच्या स्वातंत्र्यलढा ते आध्यात्मिक विचार या जीवनीतूनच पुढे गेलेली होती. ती आम्ही कशी, किती पुढे नेऊ? कितपत टिकवून वाढवू शकू, निरंतर व न्यायपूर्ण विकासाच्या दिशेने, हाच प्रश्न उराशी धरून.... मनस्वी श्रद्धांजली देत आहे, सर्व सहकारी साथींसह!

medha.narmada@gmail.com

आदरांजली

# पर्यावरण रक्षणाचा दूत गेला...

## सुनीती सु. र.

आपले ज्येष्ठ मित्र सुजितभाऊ पटवर्धन यांचे नुकतेच पुण्यात निधन झाले. मागचे काही दिवस, महिने ते जरा आजारी होते. घरातच पडल्याने त्यांना हॉस्पिटलमध्ये नेले पण तब्येत गंभीर होत गेली व बावीस ऑक्टोबर रोजी ते आपल्यातून निघून गेले.

सुजित भाऊंचा थोडा उंच, अनुनासिक, इंपेशंट, आग्रही स्वर कानात घुमतो आहे. नर्मदा असो की लवासा, पुण्याच्या वाहतुकीचा प्रश्न असो की 'मुंबई-पुणे एक्सप्रेस वे'चा; सुजित भाऊ पूर्ण अभ्यासासह आणि त्यांच्या त्या स्वाभाविक उत्कटतेसह त्या प्रश्नाच्या मुळाशी जायचे. अभ्यास, पर्यायांच्या मांडणीसह रस्त्यावरही उतरायचे आणि न्यायालयातही धडक द्यायचे. नदीपत्रातले रस्ते असोत की टेकडी फोडून रस्ता बनवण्याचे प्रस्ताव; सुजित भाऊंनी या पर्यावरणीय विनाशाला कायम अटीतटीने विरोध केला. तो विरोध करतानाच पर्यायही सुचवले. क्यूरिटिबाच्या धर्तीवर बस वाहतुकीसाठीच्या स्वतंत्र मार्गिकांचा पर्याय त्यांनीच आग्रहाने मांडला. त्यासाठी आग्रह धरला. पुण्यात तो फारसा यशस्वी झाला नाही याची कारणे वेगळी आहेत.

अर्थात पर्यावरणाच्या लढाया जिंकणे सोपे नसतेच. हितसंबंधी राजकारणी, बिल्डर्स युती तर असतेच, पण नागरिकही तात्कालिक सोयीचाच विचार करत असतात. त्यामुळे अशा कार्यकर्त्यांना विकास विरोधी ठरवले जाते. खरेतर ते पर्यावरण रक्षक असतात!

सुजित भाऊंच्या या सर्व कार्यात तर प्रत्यक्ष-अप्रत्यक्ष आम्ही सोबत होतोच, त्या निमित्ताने एकत्र येणे, चर्चा, कृती होत असत. मागे त्यांनी तयार केलेल्या पोस्टर प्रदर्शनासह आम्ही पुण्याच्या रस्त्यारस्त्यावर, बसस्टॉप्सवर लोकसंवाद केला होता त्याचे त्यांना फार कौतुक वाटले होते.

लवासा विरोधी लढ्यात त्यांची भक्कम साथ राहिली. लवासाच्या कार्यालयात झालेल्या जनसुनावणीत ते मी व विश्वंभर भाऊंसोबत सहभागी झाले होते. पुढे न्यायालयीन लढाईतही ते आमच्यासोबत एक पीटीशनर राहिले. त्या काळात सतत संपर्क, संवाद आणि त्यातून एक सौहार्दाचे नाते तयार झाले...

आणखी एका संदर्भात त्यांचे आपले नाते घट्ट बांधले गेले. आंदोलन मासिकाचे काम २२ वर्षे पुण्यातून चालले. त्यातले १८-१९ वर्षे आंदोलनचे अंक त्यांच्या 'मुद्रा' मधेच छापले गेले. मुद्रा हे पुण्यातील महत्वाचे व्यावसायिक मुद्रक! पण आंदोलन आणि आपल्या सर्व पुस्तकांची छपाई त्यांच्याकडे तेवढीच उत्कृष्ट, तरीही कमीत कमी दराने झाली. त्यांचा सर्व स्टाफ अतिशय सौजन्याने, तत्परतेने सहकार्य करत असे त्यामुळे मुद्रातले मुद्रण हा माझ्यासाठी मोठाच दिलासा होता. आपली 'नर्मदा खोरे अजूनही न्यायाच्या प्रतीक्षेत', 'नर्मदा : गाथा संघर्ष-नवनिर्माणाची', 'दर्शन', 'आंदोलनाच्या डायरीतील काही पाने', 'समृद्धीची लूट' ही सगळी पुस्तके त्यांच्याकडेच जन्मली. त्या त्या निमित्ताने त्यांच्या त्या छोट्याशा केबिन मध्ये त्यांच्याशी होणारे संवाद, चर्चा आठवताहेत, आणि मुद्रा चे ते देखणे अभिरुचीपूर्ण कार्यालयही!

विद्याताई, लारा, अमृता, ज्यो आणि त्यांची नातवंडं, त्यांचा बृहद परिवार यांच्या दु:खात मीही सहभागी आहे. नर्मदा बचाओ आंदोलन, आंदोलन मासिक, NAPM - आम्ही सर्वच!

नर्मदा बचाओ आंदोलनाचा सुबक, अर्थवाही लोगो, 'नर्मदा की घाटी में -' या मेधाताईंच्या गीताचे त्यांनी स्वत:च्या हस्ताक्षरात (कॅलिग्राफी) केलेले पोस्टर, त्यांचा खास touch असलेली कितीतरी पोस्टर्स, पुस्तकं आत्ता डोळ्यापुढे येताहेत. असा हा आमचा साथी त्याच्या कार्यासह कायम स्मरणात राहील, कृतज्ञतापूर्वक... ! साथी तेरे सपनों को, मंज़िल तक पहुंचाएंगे!! 

sunitisr@gmail.com

आघाडीवर

# नफरत छोडो संविधान बचाओ अभियानाला सर्वत्र जोरदार प्रारंभ

**राजेंद्र बहाळकर**

देशभरातील ३०० पेक्षा जास्त जन आंदोलनांच्या पुढाकाराने होत असलेल्या नफरत छोडो संविधान बचाओ अभियानाला महात्मा गांधी जयंती दिनी २ ऑक्टोबर २०२२ रोजी जोरदार सुरवात झाली आहे.

मुंबईत खूप मोठ्या रॅली चे आयोजन करण्यात आले होते. सर्व पुरोगामी संस्था, संघटना, आंदोलने या रॅलीत मोठ्या उत्साहाने सहभागी झाली होती. भाजपेतर सर्व राजकीय पक्षांचा सक्रिय सहभाग होता. दहा हजार पेक्षा जास्त कार्यकर्ते या प्रेरणादायी रॅलीत सहभागी झाले होते. राष्ट्रीय ध्वज, पोस्टर्स, बॅनर्स, पत्रकांसह यशस्वी झालेल्या या रॅलीचे जी जी पारिख, तुषार गांधी, गुड्डी, फिरोज मिठीबोरवाला आणि विविध राजकीय पक्षाच्या नेत्यांनी नेतृत्व केले.

मुंबईतील मानखुर्द मंडाला, मुलुंड, गोराई (बोरीवली), मालाड आप्पापाडा, खार गोळीबार, सिध्दार्थ नगर, अंधेरी चार बंगला येथील विविध वस्त्यांमधून घर बचाओ घर बनाओ च्या पुढाकाराने रॅली, सभा व बैठकांचे आयोजन करीत अभियानाची आश्वासक सुरवात करण्यात आली. विविध वस्त्यांमधील या अभियानात महात्मा गांधी आणि लालबहादूर शास्त्री यांच्या तस्वीरी होत्या व या मान्यवरांना अभिवादन करीत वस्त्यांमधील प्रश्नांचा जागर करण्यात आला.

ठाणे येथे देखील नफरत छोडो संविधान बचाओ अभियानाची जोरदार सुरवात झाली. राष्ट्रीय ध्वज उंचावत बॅनर्स, पोस्टर्स ने सजलेल्या टेम्पो सह झालेल्या या रॅलीत गाणी घोषणांचा गजर होता. नफरत हटविण्याच्या प्रमुख मुद्द्यासह स्थानिक प्रश्न, कष्टकऱ्यांचे प्रश्न या रॅलीत वेशीवर टांगण्यात आले. या रॅली नंतर येथील बहुसंख्य कार्यकर्ते मुंबई येथील मुख्य रॅलीत सहभागी झालेत.

औरंगाबाद येथे उत्साहात संपन्न झालेल्या मोठ्या रॅलीत कष्टकरी वर्गाचा सहभाग लक्षणीय होता. हमाल मापाडी, कष्टकरी, हातावर पोट असणारी साधी माणसे यांचे प्रश्न प्रामुख्याने या रॅलीत मांडले गेले. समाजात प्रेम - शांती- सलोखा- सद्भाव- एकात्मता जोपासली तरच लोकांची मने जोडली जातील आणि हिच खरी महात्मा गांधी यांना श्रध्दांजली ठरेल, असा संदेश या रॅलीने दिला.

सिंधुदुर्ग जिल्ह्यात वेंगुर्ला ते शिरोडा ७५ किलोमीटरची पदयात्रा करीत अभियानाची आश्वासक सुरवात करण्यात आली. राष्ट्रीय ध्वज उंचावत, राष्ट्रीय गाणी गात, घोषणा देत व छोट्या संवाद सभा करीत या रॅली ची सांगता झाली.

कुरुंदवाड येथे संपूर्ण शहरात पदयात्रा करीत अभियानाची जोरदार सुरवात करण्यात आली. बॅनर्स पोस्टर्स सह गाणी घोषणांचा जागर करीत छोट्या संवाद सभांसह झालेल्या पदयात्रा ५० पेक्षा जास्त कार्यकर्त्यांचा सहभाग होता. जेष्ठ नेते पन्नालाल सुराणा आणि डॉ विश्वंभर चौधरी यांचा या पद यात्रेतील सहभाग हे विशेष आकर्षण होते.

नफरत छोडो संविधान बचाओ अभियानाला वर्धा जिल्ह्यात अतिशय जोरदार प्रारंभ झाला. या जिल्ह्यातील सर्व तालुक्यांमधून ७५ किलोमीटरच्या दहा पदयांत्रा चे तपशिलवार नियोजन करण्यात आले आहे. पहिली पदयात्रा २ ते ६ ऑक्टोबर दरम्यान सेवाग्राम ते आमगाव अशी पुर्ण झाली. स्वतंत्रता सेनानी लीलाताई चितळे यांच्या शुभ हस्ते राष्ट्रीय ध्वज प्रदान करीत पहिल्या यात्रेची सुरवात झाली. दुसरी पदयात्रा ८ ते १३ ऑक्टोबर दरम्यान सेवाग्राम ते वडनेर या मार्गावर मोठ्या उत्साहात पुर्ण झाली तर तिसरी पदयात्रा सेवाग्राम- हिंदी ( मेघे) ते सोरटा- वल्लभ नगर मार्गावर १४ ते १७ ऑक्टोबर २०२२ दरम्यान त्याच उत्साहात पुर्ण झाली. चवथी पदयात्रा १९ ते २१ ऑक्टोबर २०२२ दरम्यान सेवाग्राम ते सेवाग्राम ते सालई ( पेपट) - सालई ( कला) मार्गावर होत आहे. राष्ट्रीय ध्वज, बॅनर्स, पोस्टर्स सह स्वस्त दरातील दर्जेदार पुस्तकांची विक्री ; हे या पदयात्रांचे मोठे वैशिष्ट्य आहे. पदयात्रांच्या दरम्यान वाटेतील गावा गावांमधील शाळा- महाविद्यालयांमधून विद्यार्थ्यांसोबत च्या संवाद सभांमधून नफरत हटविण्याच्या प्रमुख मुद्यासह संविधान व अन्य महत्त्वाच्या विषयांवर प्रबोधनाचे चांगले प्रयत्न होत आहेत.

पुण्यात विविध संघटना- जन आंदोलनांच्या पुढाकाराने व जागरूक नागरिकांच्या सहभागातून महात्मा गांधी पुतळ्याच्या साक्षीने मोठ्या उत्साहात अभियानाचा प्रारंभ करण्यात आला. देशभरात जाणीवपूर्वक पसरवले जाणारे विद्वेशाचे व अविश्वासाचे

**(पान ३४ वर)**

भाष्य

# सुब्रमण्यम स्वामींना धर्मनिरपेक्षता, समाजवादाची ॲलर्जी!

## सुभाष वारे

माजी खासदार सुब्रमण्यम स्वामी यांनी सर्वोच्च न्यायालयात याचिका दाखल करुनसंविधानाच्या उद्देशिकेतून समाजवाद आणि धर्मनिरपेक्षता हे दोन शब्द काढून टाकण्याची मागणीकेलेली आहे. स्वामींचा रोख धर्मनिरपेक्षता आणि समाजवाद हे शब्द वगळण्यावर दिसत असला तरीत्यांचा खरा रोख रिप्रेझेंटेशन ऑफ पिपल्स ॲक्ट १९५१ मधील काही तरतुदींवर दिसतोय. याकायद्यातील कलम २९ अ(५) नुसार राजकीय पक्षांना नोंदणीच्या वेळेस समाजवाद, धर्मनिरपेक्षता यामुल्यांशी आपली बांधिलकी घोषित करावी लागते आणि त्याच बरोबर निवडणूक प्रचारात धर्माच्याआधारे मते मागितली तर ही भ्रष्ट कृती मानून संबंधिताची उमेदवारी या कायद्यातील कलम १२३(३) नुसार रद्दबातल होऊ शकते. ही अडचण दूर करण्याची मनीषा या याचिकेमागे असावी.

स्वामी हे गृहस्थ त्यांच्या वावदूकपणाबद्दल प्रसिद्ध असल्याने एरवी त्यांची बडबड दखलपात्र मानलीनसती. पण त्यांची ही याचिका अन्य एका अशाच स्वरुपाच्या याचिकेसह २३ सप्टेंबरला सर्वोच्चन्यायालयाने सुनावणीस घेतली होती म्हणून बोलायची गरज आहे. २३ सप्टेंबरला या केसमधे पुढीलतारीख मिळाली आहे.

१९७६ साली इंदिरा गांधी पंतप्रधान असताना व त्यांनी देशावर आणीबाणी लादलेली असताना४२ व्या घटनादुरुस्तीद्वारे समाजवाद, धर्मनिरपेक्षता आणि एकात्मता हे तीन शब्द संविधानाच्या प्रास्ताविकेत जोडले गेलेले आहेत. देशात आणीबाणी लादून नागरी अधिकारांचा संकोच करण्याचीकृती ही चुकीची होती. पण ४२ वी घटनादुरुस्ती ही संविधानातील ३६८ व्या कलमानुसार संसदेतबहुमताने पार पडलेली प्रक्रिया आहे. त्यामुळे ती संविधानाचा भाग बनलेली आहे. ४२ व्याघटनादुरुस्तीतील अन्य काही मुद्दे संविधानाच्या सांगाव्याशी सुसंगत नसल्याने या घटनादुरुस्तीला सर्वोच्च न्यायालयात त्याच वेळी आव्हान दिले गेले होते. त्यावेळी सर्वोच्च न्यायालयाने याघटनादुरुस्तीतील असे काही मुद्दे जे न्यायालयाला संविधानाच्या गाभ्याशी सुसंगत वाटले नाहीत, तेनिरस्त केले होते. मात्र वरील तीन शब्द प्रास्ताविकेत जोडण्याच्या निर्णयाला मात्र न्यायालयाने योग्य ठरवले होते. आणिबाणी उठवल्यावर झालेल्या सार्वत्रिक निवडणुकीत काँग्रेस पक्ष व इंदिरा गांधीयांचाही पराभव झाला. त्यानंतर सत्तेत आलेल्या जनता पक्षात भाजपचा पूर्वसूरी असलेला जनसंघ हापक्ष विलीन झाला होता. जनता पक्षानेही पुन्हा संसदेत घटनादुरुस्ती करत ४२ व्या घटनादुरुस्तीतीलआणखी काही मुद्दे फिरवले होते. त्या वेळी हे तीन शब्द प्रास्ताविकेत जोडण्याच्या विरोधात संसदेमधेही कुणी भूमिका घेतली नव्हती. पुढे जनता पक्ष फुटल्यानंतर भारतीय जनता पक्षाचा उदयझाला. भाजपचे नेते माजी पंतप्रधान अटलबिहारी वाजपेयी यांच्या नेतृत्वात भाजपनेही ''गांधीवादी समाजवाद'' हे आपले अधिकृत धोरण म्हणून स्विकारले होते. माझ्या माहितीप्रमाणे भाजपच्या घटनेतअजुनही गांधीवादी समाजवादाचा उल्लेख आहे.

सर्वात महत्वाचा मुद्दा म्हणजे ४२ व्या घटनादुरुस्तीच्या आधी जरी उद्देशिकेत समाजवाद वधर्मनिरपेक्षता हे शब्द नव्हते तरी या दोन शब्दांचा आशय स्पष्ट करणारी अनेक कलमे १९५० पासूनराज्यघटनेत आहेत.

भारताच्या संविधानाने अनेक महत्वाचे मूलभूत अधिकार नागरिकांना दिलेले आहेत आणि नागरिकत्व निश्चित करण्याबाबत संविधानाची भूमिका ही कधीही धर्माधिष्ठीत राहिलेली नव्हती. याला अपवाद फक्त २०१९ साली भाजप सरकारने आणलेला नागरिकत्व संशोधन कायदा आणि नागरिकत्व पडताळणी प्रक्रियेचा (CAANRC) आहे, ज्यामुळे नागरिकत्वाच्या प्रक्रियेला धर्माचा आधार देण्याची घातक भूमिका घेतली गेली. या कायद्याची नियमावली अद्याप बनलेली नाही. लक्षात घेण्याचा मुद्दा हा आहे की, संविधानाच्या पंचविसाव्या कलमाने भारतीय नागरिकांना आपल्यासद्सदविवेकाला अधीन राहून धर्मस्वातंत्र्याचा वा उपासनेचा अधिकार बहाल केलेला आहे. व्यक्तीगत जीवनात हा उपासनेचा अधिकार बजावताना नागरिकांनी जसे इतरांच्या धर्मस्वातंत्र्याचा आदर करणे अपेक्षित आहे तसेच दोन व्यक्तींमधील कुठलेही ऐहिक प्रश्न सोडवण्यासाठी किंवा सार्वजनिक प्रश्नांच्या सोडवणूकीत

धर्माला कुठलीही भूमिका या कलमाने ठेवलेली नाही हे समजूनघेतले पाहिजे.जर एखादी धार्मिक परंपरा सार्वजनिक शांतता, आरोग्य व नितीमत्ता याला बाधा पोहोचवत असेल तर त्याला मर्यादा घालण्याचा अधिकार या कलमाने राज्यव्यवस्थेला दिला आहे.तसेच आधुनिकराज्यव्यवस्था अस्तित्वात नसतानाच्या जुन्या काळातील एखादी धार्मिक परंपराराजकीय, वित्तीय वाआर्थिक मुद्यावर भाष्य करत असेल तर तिला धार्मिक न मानता त्याबाबतीत संविधानाच्या गाभ्याशीसुसंगत असे नवे कायदे करण्याचा अधिकारही राज्यव्यवस्थेला याच कलमाने दिलेला आहे.

संविधानाचे पंचवीसावे कलम धर्मनिरपेक्षतेची वैशिष्ट्यपूर्ण अशी संकल्पना स्पष्ट करते जे आधीपासूनसंविधानात आहेच.

संविधानाच्या उद्देशिकेत नागरिकांना आर्थिक, सामाजिक व राजनैतिक न्याय बहाल करण्याची भूमिका आहे. याचा आशय कसा नजरेआड करता येईल. अडतिसाव्या कलमाने वेगवेगळ्या नागरिकांच्या आर्थिक उत्पन्नामधील तफावत दूर करण्याची व सर्वसमाजघटकांना न्याय मिळेल अशी व्यवस्था आणण्याची जबाबदारी राज्यव्यवस्थेवर टाकलेली आहे.

एकोणचाळीसाव्या कलमाने देशातील भौतिक संसाधनांचा वापर बहुसंख्य नागरिकांच्या हितासाठी करण्याचे बंधन राज्यव्यवस्थेवर टाकले आहे. त्याचबरोबर सरकारच्या आर्थिक धोरणांमुळे संपत्ती व साधनांचेकेंद्रीकरण मुठभरांच्या हाती होणार नाही याची काळजी घेण्याचे मार्गदर्शन राज्यव्यवस्थेला याचकलमाने केलेले आहे.

एक्केचाळीसाव्या कलमाने देशाच्या आर्थिक सक्षमतेला अधीन राहून इथल्याप्रत्येक मुली-मुलाला चांगले शिक्षण व हाताला सक्षम रोजगार मिळेल हे पहाण्याची जबाबदारीराज्यव्यवस्थेकडे दिलेली आहे. सत्तेचाळीसाव्या कलमाने प्रत्येक नागरिकाचे जीवनमान व पोषणमानउंचावेल अशी धोरणे अपेक्षिली आहेत. ही सर्व कलमे आर्थिक धोरणांचा समाजवादी आशयच स्पष्टकरतात आणि ती आधीपासूनच संविधानात आहेत. म्हणजेच बेचाळीसाव्या घटनादुरुस्तीने समाजवादव धर्मनिरपेक्षता हे शब्द उद्देशिकेत जोडून काय केले, तर संविधानाच्या आतील पानावर ज्या तरतुदी होत्याच त्या संविधानाच्या पहिल्या पानावर म्हणजे उद्देशिकेत आणल्या.भारतीय संविधानहेमध्यममार्गी लोकशाही समाजवादी भूमिका घेणारे आहे. अर्थातच ते मार्क्सवादी नाही. समाजवादआणि मार्क्सवाद या वेगवेगळ्या संकल्पना आहेत हे ही आपण इथे समजून घेतले पाहिजे.

संविधानात सर्व काही आहेच पण.......

संविधानाने गरीब-श्रीमंतांच्या मधील दरी कमी करण्याची भूमिका घेतलीय. सर्वांना शिक्षण, सर्वांनारोजगार यासाठी राज्यव्यवस्थेने प्रयत्न केले पाहिजेत असे अपेक्षिले आहे. पण वास्तवात मात्रमुठभर अब्जाधिशांची संख्या वाढत असताना लाखो कुटुंबे गरीबी रेषेखाली ढकलले जात आहेत.

एकीकडे भरलेल्या ताटातलं काय काय खावं हा प्रश्न आहे तर दुसरीकडे संध्याकाळची चूल कशीपेटणार ही चिंता आहे.

शिक्षणाच्या व्यापारीकरणामूळे शिक्षण प्रचंड महाग होत चाललेले असताना शिक्षण हक्काची चळवळ ही फक्त कार्यकर्त्यांची चळवळ बनलीय. ती पालकांची चळवळबनतच नाहीये. आरक्षण मागणीच्या चळवळी जोरात आहेत आणि आसाव्यातही पण सरकारी नोकऱ्या संपवून टाकणाऱ्या  खाजगीकरणाविरोधात मात्र फारसं कुणी बोलत नाहीये. एकीकडे आरक्षणाच्या संघर्षात विविध जाती समुहांमधे द्वेषभावना वाढीला लागेल अशी यंत्रणा काम करतेय आणि दुसरीकडे खाजगीकरणाद्वारे आरक्षणच संपवून टाकण्याचा पद्धतशीर प्रयत्न होतोय हा डाव युवांच्या लक्षात येत नाहीये. बेरोजगारीची समस्या गंभीर बनलेली असताना वैयक्तिक पातळीवर प्रश्न सोडविण्यासाठी धडपडणारे बेरोजगार युवा रोजगाराच्या संधी वाढवणाऱ्या आर्थिक धोरणांसाठी संघटित होताना दिसत नाहीत. सर्व नागरिकांना सन्मानाने जगता यावे यासाठीच्या अनेक तरतुदीसंविधानात आहेत पण त्या संविधानाच्या पानावर तशाच पडून आहेत.

दुसरीकडे, भारतीय संविधानाने पंचवीसाव्या कलमाद्वारे धर्मनिरपेक्षतेचा वैशिष्ट्यपूर्ण असाआशय स्पष्ट केला आहे असे म्हणत समाधान मानावे अशी आजची स्थिती नाही. आपला धर्म, आपली श्रद्धा ही व्यक्तीगत जीवनापुरती मर्यादित असावी ही अपेक्षा असताना अनेक संविधानिक पदावरबसलेल्या व्यक्ती शासकीय कार्यालयात आणि शासकीय खर्चाने आपल्या श्रद्धांचे प्रदर्शन भरवताना दिसतात. शासकीय कार्यालयात सर्रास धार्मिक कार्यक्रम होतात.

शासकीय आवारात मंदीरे बांधलीजातात. पण कुणालाही यात काही वावगं वाटत नाही. दुसऱ्याच्या श्रद्धेचा आदर करण्याची अपेक्षा पंचवीसाव्या कलमाने केलेली असताना सर्रास इतर धर्मीयांबद्दल

**(पान ३३ वर)**

श्रमिक जगत

# शासकीय व निमशासकीय क्षेत्रातील कंत्राटी कर्मचाऱ्यांना स्थानिक स्वराज्य संस्थांसारखे किमान वेतन लागू करा

## जगदीश खैरालिया

केंद्र व राज्य शासनाच्या तसेच स्थानिक स्वराज्य संस्थांच्या कर्मचाऱ्यांना सातव्या वेतन आयोगानुसार वेतन लागू करण्यात आले आहे. महाराष्ट्र राज्यातील मुंबई, ठाणे, नागपूर पिंपरी चिंचवड आणि पुणे महानगरपालिका यांचे वेतन कामगार संघटनांच्या बरोबर वाटाघाटी होऊन औद्योगिक अवॉर्ड नुसार मंजूर केले जात होते. त्यामुळे राज्य शासनाच्या वेतन श्रेणी पेक्षा जास्त वेतनश्रेणी या काही ठराविक महापालिका कर्मचाऱ्यांना मिळत होती. परंतु यंदा मुंबई महापालिका वगळून अन्य सर्व महापालिकांना महाराष्ट्र शासनाच्या धर्तीवर सातवा वेतन आयोग लागू करण्यासाठी दबाव आणला गेला असल्याने अजूनही काही महापालिकांमधील कर्मचाऱ्यांना योग्य सुधारित वेतनश्रेणी लागू होऊ शकली नाही.

राज्य शासकीय कर्मचाऱ्यांना सहावा वेतन आयोग लागू करतांना चतुर्थ श्रेणीचे निम्नतम पेबॅन्ड रू. ४,४४० आणि ग्रेड पे रू. १,३०० होते तेव्हा ठाणे महानगरपालिकेच्या कर्मचाऱ्यांना चतुर्थ श्रेणीचे निम्नतम पेबॅन्ड रू. ५,२०० आणि ग्रेड पे रू. १,८०० मिळाले होते. आता मात्र महाराष्ट्र शासनाने अट घातली आहे की, कोणत्याही संवर्गातील कर्मचाऱ्यांना राज्य शासनाच्या समकक्ष पदापेक्षा अधिक वेतनश्रेणी असता कामा नये.

ठाणे महानगरपालिकेतील आता अस्तित्वात असलेल्या ३३५ संवर्गा पैकी फक्त २१८ संवर्गातील पदे राज्य शासनाच्या समकक्ष असल्याने फक्त त्यांनाच सातवा वेतन आयोग लागू झाल्याचे समजते. त्यात नवीन वेतनश्रेणी लागू करतांना अनेक अधिकारी/कर्मचाऱ्यांचे वेतन कमी होत असल्याची आरडाओरड सुरू आहे. खुद्द महापालिका प्रशासनाने महाराष्ट्र शासनाला दि. २८सप्टेंबर २०२२ रोजी पाठवलेल्या प्रस्तावात म्हटले आहे की, ''ठाणे महापालिकेत राज्य शासनाकडून प्रतिनियुक्तीवर पाठवण्यात येणाऱ्या अधिकारी/कर्मचाऱ्यांना महापालिका सेवेत असेपर्यंत त्यांना महापलिकेची वेतन श्रेणी नुसार वेतन लागू करण्याबाबतचे प्रस्तावाला महाराष्ट्र शासनाने मंजूरी द्यावी''.

उर्वरित १२८ संवर्गातील पदातील कर्मचाऱ्यांना सुधारित वेतनश्रेणी लागू करण्या बाबतीत स्वतंत्रपणे प्रस्ताव पाठवून शासनाकडून मंजुरी घेतल्यावरच सातव्या वेतन आयोगानुसार सुधारित वेतनश्रेणी मिळण्यासाठी वाट पाहावी लागणार आहे. या १२८ संवर्गातील वर्ग १ ते ४ मधील अधिकारी व कर्मचारी २५-३० वर्षे सेवा देत आहेत. त्यांना आता पर्यंत अनेक औद्योगिक वेतन अवार्ड लागू झाले, पण वेतननिश्चिती करतांना अशा अडचणी कधीही निर्माण झाल्या नव्हत्या.

सातवा वेतन आयोग लागू करतांना काही पदांवरील कर्मचाऱ्यांच्या वेतनातून वसूली होत असल्याचे समोर आले आहे. जी पदे राज्य शासनाच्या आस्थापनेत अस्तित्वात नाहीत त्यांना वेतन निश्चिती कशी करावी हा सुद्धा पेच ठाणे महापालिके समोर निर्माण झाल्याची चर्चा सुरू आहे. ठाणे महापालिकेच्या आरोग्य विभागाचे /फायलेरिया विभागाचे कर्मचारी म्हणजे आजचे फिल्डवर्कर आणि सुपिरिअर फिल्डवर्कर हे पद ठाणे महापालिकेत अस्तित्वात नव्हते.साफसफाईचे काम आणि फायलेरिया/ कीटकनाशके फवारणीचे काम हे सर्वच सफाई कामगार करायचे. आणि त्यांना वेतन, भत्ते सोयी सुविधा सारख्याच मिळत असत. सर्वांना लाड कमिटीच्या शिफारशी नुसार वारसाहक्क ही लागू होता. परंतु आरोग्य विभागातून घनकचरा व्यवस्थापन विभाग स्वतंत्रपणे स्थापन करतांना फिल्डवर्कर आणि सुपिरिअर फिल्डवर्कर पदे निर्माण करण्यात आली आणि आरोग्य (फायलेरिया) विभागातील सफाई

कर्मचाऱ्यांना वारसाहक्क सुद्धा गमवावे लागले. कीटकनाशके फवारणीचे काम करणारे फिल्डवर्कर आणि सुपिरिअर फिल्डवर्कर पदे ही राज्य शासनाच्या समकक्ष संवर्गात बसत नसल्याचे कारण सांगत त्यांना ही सातव्या वेतन आयोगाची वेतनश्रेणी लागू होण्यासाठी प्रतिक्षा करावी लागत आहे. १जानेवारी २०१६ पासून सातव्या वेतन आयोग आधारित वेतनश्रेणी लागू होणे आवश्यक असताना २०२२ संपत आले तरी कर्मचाऱ्यांना सुधारित वेतनश्रेणीसाठी प्रतिक्षा करावी लागत आहे.

तळागाळातील कर्मचाऱ्यांवर अन्याय होऊ नये म्हणून विविध कामगार कायदे अस्तित्वात आणले आहेत. त्यात किमान वेतन अधिनियम १९४८ अतिशय महत्त्वाचा कायदा आहे. विविध क्षेत्रातील श्रमिकांचे किमान वेतन धोरण ठरवतांना, कामगारांना त्यांच्या कुटुंबाला किमान वेतनाचे दर ठरवतांना कर्मचाऱ्यांच्या कुटुंबातील व्यक्तीला अन्न, वस्त्र, निवारा, शिक्षण,आरोग्य, आणि अन्य अत्यावश्यक गरजा भागविण्यासाठी आवश्यक वेतन मिळणे अपेक्षित आहे. आजच्या महागड्या व्यवस्थेत जगण्यासाठी शासनाने किमान वेतन निर्धारित करतांना सुमारे ६५ अनुसूचित उद्योग गृहीत धरले आहेत. त्यांना तीन परिमंडळात विभागून त्या त्या परिमंडळातील उद्योगांना किमान वेतन निर्धारित करून वेळोवेळी त्याची गरजेनुसार समीक्षा करून सुधारणा ही केली जाते.

महानगरपालिका क्षेत्रातील उद्योगनिहाय किमान वेतन ठरवतांना मूळ वेतनात तफावत असणे हे समजू शकते पण विशेष भत्ता/ महागाई भत्ता जो महागाई निर्देशांक ग्रहित धरून ठरवला जातो तो एकाच परिमंडळातील श्रमिकांना संवर्गांना कमीजास्त असणे न्याय्य कसं अशू शकतो ? हा प्रश्न मनाला येऊन भिडतोच. याबाबतीत शासनकर्त्यांनी गांभीर्याने विचार करत परिमंडळनिहाय सर्व उद्योगांना एक सारखे विशेष भत्याची/ महागाई भत्याची तरतुद करणे न्याय्य ठरू शकेल!

महाराष्ट्र शासनाने सातवा वेतन आयोग लागू करतांना शासकीय, निमशासकीय, स्थानिक स्वराज्य संस्था आदीच्या कायमस्वरूपी कर्मचाऱ्यांना एकच वेतन संरचनेत आणण्यासाठी प्रयत्न केले आहे. तर मग शासकीय, निमशासकीय, स्थानिक स्वराज्य संस्थांमधील ठोक पगारावरील व कंत्राटी कामगारांना सुद्धा एक सारखे वेतन धोरण का ठरू शकत नाही ? शासकीय रूग्णालय, जिल्हाधिकारी, जिल्हा परिषद, न्यायालयात अंतर्गत कार्यरत कर्मचारी आणि स्थानिक स्वराज्य संस्था मधील रूग्णालय किंवा अन्य आस्थापनेत कार्यरत कर्मचाऱ्यांचे कामाचे स्वरूप सारखे आहे. उदाहरणार्थ ठाणे महानगरपालिकेचे छ. शिवाजी महाराज रूग्णालय, दवाखाने, आरोग्य केंद्र आणि जिल्हा सामान्य रूग्णालय, उपजिल्हा रुग्णालय, जिल्हा परिषदेचे आरोग्य केंद्र येथे कार्यरत सफाई कर्मचाऱ्यांच्या कामाचे स्वरूप, सेवाशर्ती आणि कामामुळे होणारे आजारांचे आरोग्य विषयक धोके सुध्दा सारखेच असतात.

महाराष्ट्र शासनाने २४ फेब्रुवारी२०१५ पासून सुधारित किमान वेतन लागू केले आहे. त्यानुसार महापालिकेच्या रूग्णालयातील सफाई कर्मचाऱ्यांना मूळ वेतन रू. ११,५०० अधिक विशेष भत्ता म्हणून रू. ७,०७० असे एकूण १८,५७० मासिक वेतन असतांना प्रादेशिक मनोरूग्णालयातील सफाई कर्मचाऱ्यांना मात्र तुटपुंज्या वेतनावर राबविले जात आहे. अश्या स्थितीत शासकीय, निमशासकीय रूग्णालय आणि अन्य आस्थापनेतील कंत्राटी कर्मचाऱ्यांना वेतन आयोगातील चतुर्थ श्रेणीचे वेतन आणि पेबेंड इतके मूळ वेतन किंवा स्थानिक स्वराज्य संस्थांच्या कर्मचाऱ्यांसारखे किमान वेतन लागू करण्याची समन्यायी भूमिका महाराष्ट्र शासनाने घ्यायला हवी.

jagdish.khairalia25@gmail.com

जगभर

# इराण, इटली, ब्रिटन

## चंद्रशेखर पुरन्दरे

**इराण**

इराणमध्ये १९७९ च्या क्रांतीनंतर शहाचे राज्य जाऊन कट्टर मुस्लिम राजवट अस्तित्वात आली. आयातोल्ला खोमेनी हा धर्मगुरू इराणचा सर्वेसर्वा झाला. राजवटीने अनेक व्यक्तिस्वातंत्र्ये उतरोत्तर कमी केली. राजवटीला विरोध करणे, सनातन मुस्लिम धर्माचे पालन न करणे हे दंडपात्र गुन्हे ठरले. त्याची अंमलबजावणी अत्यंत निष्ठुरपणे करण्यात आली. तेच धर्मांध धोरण खोमेनीनंतरच्या सध्याच्या आयातोल्ला खामेनीने चालू ठेवले. २००५ साली म्हणजे खोमेनीच्या मृत्यूनंतर सामान्य नागरिकांवरील देखरेखीसाठी एक विशेष पोलिस खाते निर्माण करण्यात आले. त्याचे नाव Guidance Patrol म्हणजे 'मार्गदर्शक निरीक्षक'.

या अंमलबजावणीचा भाग म्हणून स्त्रियांवर विशेष निर्बंध घालण्यात आले. सार्वजनिक ठिकाणी स्त्री आपादमस्तक बुरख्यात असली पाहिजे. फक्त चेहरा दिसावा एवढी सवलत. संपूर्ण डोके झाकले जाईल असाच बुरखा असायला हवा, तसा नसल्यास त्या स्त्रीला लगेच अटक करून तिची तुरुंगात रवानगी करण्यात येते, तेथे 'मार्गदर्शन!'

म्हणजे, स्त्रीस्वातंत्र्य सोडाच, रोजचे जगणेही कायम सरकारी देखरेखीखाली आणि धास्तीत. सरकारी क्रौर्याचा ताजा निर्घृण आविष्कार सप्टेंबर महिन्यात जगाला बघायला मिळाला. महसा अमिनी नावाची २२ वर्षांची कुर्द वंशीय तरुणी. तिचे वास्तव्य इराणच्या उत्तरेकडील कुर्दबहुल प्रदेशात असे. ती तिच्या भावाला भेटायला तेहरान या इराणच्या राजधानीला आली होती. बुरखा इस्लामच्या सांगण्याप्रमाणे घातला नाही म्हणून पोलिसांनी तिला अटक केली. तुरुंगात तिचे अनन्वित हाल करण्यात आले, तिला हॉस्पिटलला दाखल करण्याची वेळ आली. ती कोमामध्ये गेली आणि १६ सप्टेंबरला पोलिस कस्टडीत मृत्यू पावली.

या पोलिसी हत्येविरुद्ध प्रथम तिच्या स्थानिक कुर्द प्रदेशात संताप उसळला. त्याला वेगळाही पैलू आहे. तो म्हणजे, कुर्द हे इराणमध्ये अल्पसंख्यांक आहेत. त्यांच्यावर पर्शियन बहुसंख्येचा वसाहतवाद कायम राहिलेला आहे. अगदी अलीकडे जेव्हा कुर्द लोकांनी परत एकदा स्वायत्ततेची मागणी केली तेव्हा खोमेनीचा उजवा हात असणाऱ्या कासिम सुलेमानी नावाच्या लष्करी अधिकाऱ्याने इराकमध्ये त्यांच्यावर हिंसक कारवाई केली व किर्कुक हे तेल-उत्पादनाचे प्रमुख शहर इराकच्या - पर्यायाने इराणच्या - आधिपत्याखाली आणले. त्यामुळे कुर्द प्रदेशातील महसाच्या हत्येच्या निषेधात खामेनीबरोबरच सुलेमानीचाही निषेध झाला. [इराणशेजारच्या इराक, सीरिया, तुर्कस्तानातही कुर्द अल्पसंख्यांक असून त्या त्या राजवटी त्यांच्यावर अत्याचार करत आलेल्या आहेत, पण तो विषय निराळा. *आंदोलन, नोव्हेंबर* २०१९], महसाचा खून हा धार्मिक आतंकवाद अधिक वसाहतवाद असा हा प्रश्न कुर्द प्रदेशात पाहिला जात आहे. पण निषेध त्या प्रदेशापुरता मर्यादित राहिला नाही. इराणच्या सर्व भागात राजवटीविरुद्ध लोक रस्त्यावर आले.

यात दोनतीन वैशिष्ठ्ये आहेत. एकतर निषेधकांच्यात स्त्रिया बहुसंख्य आहेत आणि त्या खामेनीविरुद्ध वैयक्तिक आणि पोलिसी दमनशाहीविरुद्ध व्यवस्था म्हणून निषेध करत आहेत. अनेक स्त्रियांनी त्यांचे बुरखे रस्त्यांवर काढून टाकले आणि सार्वजनिक होळी केली. अनेकींनी आपले केस रस्त्यांवर, घरी कापले व त्याचे विडिओ प्रसृत केले. या विरोधाचा विस्तार इराणच्या अलीकडच्या इतर निषेधांपेक्षा तीव्रतेत आणि लोकांच्या सहभागाच्या दृष्टीने फार मोठा होता. विरोधातील स्त्रियांचा एवढ्या मोठ्या प्रमाणात सार्वजनिक सहभाग ही इराणमधील अभूतपूर्व प्रक्रिया आहे. दुसरे वैशिष्ठ्य म्हणजे हा निषेध फक्त सक्तीचा बुरखा या जुलुमाविरुद्ध नव्हता हे विरोधकांनी स्पष्ट केले. स्त्रियांना अपमानास्पद वागणूक देणाऱ्या सरकारी धोरणाविरुद्ध निषेध आहे, आम्हाला ही धर्माधिष्ठित राजवट मंजूर नाही, ती गेली पाहिजे. तसेच ही आमच्या मानवी मूलभूत अधिकाराची मागणी आहे. जागतिक व्याप्तीवर मानवी हक्कांचा

हा प्रश्न आहे असे त्यांनी आवर्जून सांगितले.

या विरोधाविरुद्ध राजवटीने अपेक्षित दंडेलशाही सुरु केली. त्यात किमान २०० लोक आजवर ठार झाले असावेत. त्यात महिलाही, तरुण १६-१७ वर्षांच्या मुलीही बळी पडल्या. अटका तर हजारात झाल्या. त्यांचे हाल होतीलच. प्रकरण आटोक्यात येत नाही हे पाहून निषेध सुरु झाल्यानंतर काही दिवसांनी आयातोल्ला खामेनी याने त्याची दखल घेतली. त्यात महसाच्या मृत्यूबद्दलचा खेद नाममात्र होता. [मनमोहन सिंग यांनी निर्भया प्रकरणादरम्यान टीव्हीवरच्या त्यांच्या निवेदनानंतर स्टुडिओच्या माणसाला 'ठीक है ?' असे विचारले होते - म्हणजे माझे निवेदन ठीक होते का ? प्रकरणाचे गांभीर्य दूरच.] तसाच खामेनीचा प्रमुख आक्षेप लोकांच्या पोलिसांविरुद्धच्या निषेधाचा होता. पोलिसांविरुद्धची भूमिका राजवट कधीही मान्य करणार नाही हे खामेनीने स्पष्ट केले. राजवटच जेव्हा पोलिसी दमनावर आधारित आहे, तेव्हा राज्यकर्ता हीच भूमिका घेणार यात आश्चर्य नाही. इराणी सेलेब्रिटी महिलांची बुरख्यातील बनावट पोस्टर्स आणि त्यांचा बुरख्याला पाठिंबा आहे अशी खोटी विधानेही प्रसृत करण्यात आली. यातील काही महिलांनी हा अपप्रचार आहे असे जाहीर केल्यावर ती पोस्टर्स काढून टाकण्यात आली. इराणमधील कोणत्याही असंतोषाचे जनक इस्त्राइल आणि अमेरिका हे इराणचे शत्रू असतात. त्यांना या असंतोषाबद्दलही जबाबदार धरण्यात आले. म्हणजे, कोणत्याही राजवटीसारखाच हा पवित्रा आहे. समस्या अस्तित्वातच नाही असे आग्रहाने सांगायचे, मग सरकारच्या चुकीचा प्रश्नच येत नाही. समस्या उभी केली राजवटीच्या एतद्देशीय आणि आंतरदेशीय शत्रूंनी.

पण राजवटीच्या उच्चपदस्थ वर्गात या सामाजिक असंतोषामुळे चलबिचल सुरू झाली. हा सकारात्मक संकेत आहे.अली लारजानी हा इराणच्या संसदेचा माजी अध्यक्ष व अलीकडच्या अध्यक्षीय निवडणुकीतील एक उमेदवार होता, त्याने पोलिस अनावश्यक बळ वापरत आहेत. हिजाबचा प्रश्न समाजावर सोपवावा, पोलिसांवर नाही असे मत दिले. म्हणजे, बुरखा हा इस्लामचा अविभाज्य भाग आहे या भूमिकेवर प्रश्नचिन्ह उभे रहाते. आपल्याकडे सुप्रीम कोर्टाच्या द्विसदस्यीय पीठाने कर्नाटकच्या बुरखा प्रकरणावर नुकताच दुभंग निर्णय दिला त्यातील एक निर्णय या धर्तीवर आहे.

विद्यमान आंदोलनामागे इतर घटकही आहेत. इराणच्या अण्वस्त्रक्षमतेविरुद्ध त्याच्या आंतरराष्ट्रीय व्यापारावर निर्बंध आहेत त्यामुळे अर्थव्यवस्था दुबळी झाली आहे. बेरोजगारी, चलनाच्या अवमूल्यनामुळे महागाई, जीवनावश्यक वस्तूंचा तुटवडा इत्यादि गोष्टींनी सामान्य माणूस त्रासलेला आहे. अशा वेळी धर्माचा पुनरुच्चार करण्याने लोकांचे लक्ष दुसरीकडे वळवले जाते. मग उर्वरित जग ज्याला स्त्रीद्वेष म्हणेल, तो धर्माने ठरवलेला नियम आहे असे प्रतिपादन केले जाते. रोजच्या जगण्याचा प्रश्न अधिकाधिक बिकट होताना लोकांसाठी महसा ही ठिणगी पडली. शिवाय अल्पसंख्यांकांकडे दुर्लक्ष हे एरवी बहुसंख्यांकांना मंजूर असणारे धोरण असते, त्यामुळे महसा कुर्द होती, मग बिल्किस बानूसारखे तिच्याकडे दुर्लक्ष होईल हा राज्यकर्त्यांचा होरा मात्र चुकला.

या संदर्भात एका निरीक्षणाचा उल्लेख केला पहिजे. त्यानुसार असे मोठे सामूहिक निषेध या ना त्या कारणास्तव जगभर वाढताना दिसले तरी त्यांची परिणामकारकता गेल्या दशकात कमी होत आहे. दहा वर्षांपूर्वी मध्य-पूर्वेतील काही हुकूमशाही राजवटी अशा विराट लोकक्षोभाने उलथल्या गेल्या. पण आता चित्र बदललेले दिसते. श्री लंकेचा अपवाद सोडता, जेथे प्रचंड सामूहिक निषेधाने राजवट बदलली, इतरत्र अशा निषेधांनी सरकारवर धोरण मूलत: बदलण्याइतके किंवा सरकार उलथण्याइतके दडपण येत नाही असे दिसते. या अपयशाची अनेक कारणे सांगितली जातात. आर्थिक, सामाजिक ध्रुवीकरण जास्त असलेल्या देशांमध्ये उदा. भारत - वरचा वर्ग निषेधापासून अलिप्त रहातो. सत्ताधाऱ्यांना ते सोयीचे जाते. निषेध संपूर्ण जनतेचा नाही, मूठभर लोकांचा आहे असा दावा ते करू शकतात. सोशल मीडियामुळे मोठ्या संख्येने लोक अल्पावधीत जमा होतात पण दीर्घकालीन चळवळीसाठी आवश्यक चिवटपणा त्यांच्याकडे नसतो. त्यामुळे लाखांत होणारा निषेध लगेचच विरून जातो. उदा. अण्णा हजारेंचे दिल्लीतील आंदोलन. सरकारेही सोशल मीडियावरून लोकांच्या मनात चळवळीच्या उद्दिष्टाबद्दल संदेह निर्माण करतात, त्यामुळे असे निषेध माफक परिणाम करत आहेत.

**(पान ३३ वर)**

## 'आंदोलन शाश्वत विकासासाठी'च्या दीपावली २०२२ विशेषांकास हार्दिक शुभेच्छा!

(भाष्य : पान २७ वरून)
द्वेष पसरवणारी भाषणे होतात आणि कोणावरही कारवाई होत नाही. झुंडबळीच्या वारंवार घडणाऱ्या घटना अस्वस्थ करतात. झुंडबळीचाआरोप असणाऱ्यांचे जाहीर सत्कार खुद्द मंत्री करतात. बिल्कीस बानोवरील बलात्काराच्या आरोपातसजा झालेल्यांची राज्य सुटका करते आणि समाजातील काहीजण त्यांचे सत्कार करतात, का तर त्यांनी परधर्मातील महिलेवर बलात्कार केलेला असतो.

मतांच्या राजकारणासाठी धार्मिक द्वेष आणि उन्माद पसरवण्याची भूमिका देशाला कमकुवत करतेय. तर दुसरीकडे धर्माची वा प्रेषितांबाबतची चिकीत्सा सहन करण्याची तयारी नसणारे असंवेदनशील तरुण ''सर तनसे जुदा'' म्हणत समोरच्याच्या हत्येला प्रवृत्त होतात. धर्माच्या नावाने गंभीर गुन्हेगारी कृत्य करतात हे ही निषेधार्ह आहे.व्यक्तीगतजीवनात आपल्या इच्छेनुसार धर्मपालनाचे स्वातंत्र्य देतानाच सार्वजनिक जीवनाच्या नियमनात आता धर्माला काहीही भूमिका संविधानाने ठेवलेली नाही. आता ते काम संविधानावर आधारित कायद्यांचे आहे. त्यात आड येणाऱ्या एखाद्या धार्मिक परंपरेची चिकित्सा होणार, हे वास्तव सर्वधर्मीयांनी स्वीकारले पाहिजे. आपल्यावर अन्याय होतोय अशी भावना असेल तर कायद्याच्यामार्गानेच दाद मागितली पाहिजे. तो रस्ता कितीही अवघड व दूरचा असला तरीही. धर्मनिरपेक्षता केवळसंविधानात असून उपयोग नाही. ते मूल्य समाजात रुजविण्यासाठी खूप काही करणे गरजेचे आहे.

संविधानाची ताकद सार्वभौम जनतेतून संविधानाला ताकद फक्त सर्वोच्च न्यायालयाकडून अथवा संसदेकडून मिळत नसते तरसंविधानाला खरी ताकद सार्वभौम अशा जनतेकडून मिळत असते. नागरिक जोवर संविधानिक मूल्यांच्या पाठीशी उभे रहाण्याची भूमिका घेत नाहीत तोवर कितीही क्रांतीकारी अशा संविधानिक तरतुदींना काही अर्थ रहात नाही. त्यामुळे सुब्रमण्यम स्वामींच्या याचिकेवर न्यायालयाचा निर्णय जोयायचा तो येईल, आपण सर्वांनी संविधान लोकांपर्यंत घेऊन जाण्याचे काम केले पाहिजे तसेच ''सर्व भारतीयांना सन्मानाने जगण्याचा संविधानिक अधिकार मिळावा'' यासाठी जनमत संघटित करण्याचे कामही करत राहिले पाहिजे. 

ware.subhash@yahoo.in

(जगभर : पान ३१ वरून)
**इटली**

इटलीत नुकत्याच झालेल्या निवडणुकांत एका नवोदित पक्षाचा विजय झाला. दुसऱ्या महायुद्धाचे दोन प्रमुख अति-उजवे गुन्हेगार- जर्मनीचा हिटलर आणि इटलीचा मुसोलिनी. त्यातल्या मुसोलिनीचा वारसा अभिमानाने सांगणारा अति-उजवा पक्ष जिंकला. जगात एकूणच लोकशाही मार्गाने उजवे नेतृत्व आघाडीवर आहे. वांशिक व राष्ट्रीय दुराभिमान, निर्वासित नकोत वगैरे त्यांची भूमिका. हंगेरी, स्वीडन, फ्रांस, तुर्कस्तान हे या कलाचे काही देश. त्या प्रवाहाचा हा भाग. त्यात इटलीमध्ये राजकीय अस्थिरता कायमची असते. सारख्या निवडणुका होतात. गेल्या चाळीस-पन्नास वर्षांत बहुतेक पंतप्रधान जेमेतेम दीड-दोन वर्षे टिकले. नवे सरकार किती काळ टिकेल त्यावर देशाची दिशा ठरेल. पण त्याची अति-उजवी दिशा जगासाठी श्रेयस्कर नाही. त्यामुळे युरोपिअन युनियनचे भवितव्य हा युरोपात सध्याच्या चिंतेचा विषय आहे.

**ब्रिटन**

ऑक्टोबरच्या लेखात म्हटल्याप्रमाणे ब्रिटनच्या नवीन पंतप्रधान लिझ ट्रस यांचा धोरणलकवा चालूच राहिला, पक्षांतर्गत विरोध वाढल्याने त्यांनी अखेर २० ऑक्टोबरला राजीनामा दिला. त्या केवळ ४५ दिवस पंतप्रधान होत्या. ब्रिटनच्या इतिहासातील पंतप्रधानाची ही सर्वात कमी कारकीर्द. आता नव्या पंतप्रधानाचा शोध आहे.

ट्रसच्या अर्थमंत्र्याने २३ सप्टेंबरला मध्यावधी बजेट जाहीर करताच ब्रिटिश पौंड घसरला, बाजारात कमालीची अस्थिरता आली आणि परदेशी गुंतवणुकी धोक्यात आल्या. मग त्यांनी तातडीने नवीन अर्थमंत्री नेमला. त्याने बजेटच्या बहुतेक तरतुदी रद्द केल्या आणि नवीन धोरण जाहीर केले. या तीन वर्षातला हा सहावा अर्थमंत्री, त्यापाठोपाठ गृहमंत्र्याने ''या सरकारची दिशाच कळत नाही'' अशी टीका करून राजीनामा दिला.

ब्रिटन हलाखीच्या आर्थिक परिस्थितीत आहे. ती सुधारण्यासाठी स्थिर सरकार आवश्यक आहे. पण आता ब्रिटन वर म्हटलेल्या इटलीच्या दिशेने जातो काय अशी चर्चा सुरू झाली आहे. 

purandarearts.com
art-non-deco.com
artnondeco@yahoo.co.uk

**(भूमिका : पान १० वरून)**

करतील. २५ जानेवारीला दिल्लीच्या सीमेवर पोहोचतील व २६ जानेवारीला, गणतंत्र दिवशी पदयात्रेने निघून ३० जानेवारीला दिल्लीत पोहोचतील. दिल्लीतील जंतर मंतर येथे एकत्र येऊन गांधी स्मृती ते राजघाट असे चालत 'हुतात्मा दिनी' या हुतात्म्यांचे स्वप्न पूर्ण करण्याची शपथ घेतील.

- २६ जानेवारीपासूनच 'हर हाथ में संविधान' मोहीम देशभर सुरू होईल. त्यातून लोकशाही वाचवण्याचे, संविधान वाचवण्याचे जनआंदोलन उभे राहील असा आम्हाला विश्वास आहे.

**डॉ. जी. जी. परीख, मेधा पाटकर, तुषार गांधी, गीता रामाकृष्णन, शबनम हाशमी, अविक साहा, अरुण श्रीवास्तव, डॉ. सुनीलम, फिरोज मिठिबोरवाला, अशोक भारती, राजू बोरा, फैसल ख़ान, गुड्डी**

संपर्क : डॉ. सुनीलम् – ८४४७७ १५८१०,
फिरोज मिठीबोरवाला – ९०२९२ ७७७५१
गुड्डी – ७७३८०८२१७०
महाराष्ट्र संपर्क : राजेंद्र बहाळकर – ९८२२५ ९६३७०,
सुनीती सु.र. – ९४२३५ ७१७८४

**(आघाडीवर : पान २५ वरून)**

वातावरण बदलून परस्पर सौहार्द, सहिष्णुता, सर्व धर्म समभावावर आधारित 'आयडिया ऑफ इंडिया' पुन्हा एकदा जनमानसात रुजविण्यासाठी हे अभियान देशभर राबविण्यात येत असल्याची मांडणी या कार्यक्रमात करण्यात आली. मानव कांबळे, सुनिती सु र, मारुती भापकर, काशिनाथ नवाथे, नितीन पवार, गौरी देशमुख, अलका पावनगडकर, इब्राहिम खान या मान्यवरांचा प्रमुख सहभाग होता. संविधान प्रास्ताविकेचे वाचन देखील करण्यात आले. दुसऱ्या टप्प्यात महात्मा गांधी पुतळा ते डॉ बाबासाहेब आंबेडकर पुतळा मार्गावर पदयात्रा काढण्यात आली. अभियानाची भुमिका असलेले पत्रक गाणी व घोषणांनी दुमदुमलेल्या पद यात्रे दरम्यान नागरिकांना वितरित करण्यात आले.

७५ किलोमीटरच्या पदयात्रांच्या नियोजनाच्या बैठका विविध जिल्ह्यात होत असून मोठ्या संख्येने होत असलेल्या व होणार असलेल्या पदयात्रांमधून दुष्ट हेतुने जनमानसात रुजविण्याचा प्रयत्न असलेली नफरत हटविली जाईल, असा विश्वास सर्वत्र व्यक्त करण्यात येत आहे. 

९८२२५९६३७०

Marathi-Monthly - Andolan Shashwat Vikasasathi, Editor-Medha Patkar. Postal Regn. No. MCE/296/2021-23
RNI No. MAHMAR/2009/30128 Licence to Post without Prepayment No. MR/Tech WPP/East/358/2021-23
Date of Publication 1st of every month Date of Posting 1st of every month Posted at Dadar P.O. 400014.

## विनम्र आदरांजली



सुजित पटवर्धन



संजीव साने





**To**

'शाश्वत विकास न्यास'च्या मालकीचा 'आंदोलन-शाश्वत विकासासाठी'चा हा अंक संपादक, मुद्रक, प्रकाशक मेधा पाटकर यांनी 'श्री गुरुकृपा प्रिंटर्स' १२१, अलाइड इंडस्ट्रियल इस्टेट, राम पंजवानी मार्ग, माहिम, मुंबई ४०००१६ येथे छापून दादर, मुंबई येथून प्रकाशित केला.
**प्रेषक : द्वारा केमिकल मजदूर सभा, २९-३०, पहिला मजला, 'ए' विंग, हाजी हबीब बिल्डींग, नायगाव क्रॉस रोड, दादर (पूर्व), मुंबई ४०००१४.**